श्रीगणेशाय नमः ॥ ॥ श्रीसरस्वत्यै नमः ॥ ॥ ॐनमोजी गणनायका ॥ भक्तवत्सला वरदायका ॥ अनंतकोटी विघ्नहारका ॥ सुखकारका नमोस्तुते ॥ १ ॥ तुझिये स्मरणें विघ्नें पळती ॥ म्हणोनि तूंतें विघ्नराज म्हणती ॥ तुझिये चरणीं जे कां नमती ॥ होसी तयांप्रती बुद्धिदाता ॥ २ ॥ ऐसें आहे तव महिमान ॥ म्हणोनि वंदितों आरंभीं चरण ॥ तरी गजानना बुद्धि देऊन ॥ करीं तूं पूर्ण मनोरथ ॥ ३ ॥ आतां नमूं शारदासती ॥ जीवाग्रूपिणी श्रीसरस्वती ॥ जियेचे इच्छामात्रें स्फूर्ती ॥ होय ग्रंथीं उत्तम ॥ ४ ॥ आतां नमो जगदंबिके ॥ विंध्याचलनिवास कारके ॥ तुझिये प्रसादें त्वद्भक्तनिके ॥ तरती कौतुकें भवसिंधु ॥ ५ ॥ ऐशी तव प्रसिद्ध कीर्ती ॥ म्हणोनि आलों त्वच्चरणाप्रती ॥ तरी कृपाळूपणें देऊनि भक्ती ॥ पुरवी आर्ती जगन्माते ॥ ६ ॥ आतां तुज द्वारकानायका ॥ नमन असोजी वरदायका ॥ तव चरणीं मद्भावनिका ॥ भक्तपाळका असों दे ॥ ७ ॥ जो देवदेवांचा अधीश्वर ॥ ऋषिजन मानस चकोर चंद्र ॥ मुनिहृदयारविंद भ्रमर ॥ तो तूं उपेंद्र जगद्गुरू ॥ ८ ॥ तूं द्वारकापुरीं यदुवीरा ॥ प्रत्यक्ष नांदसी रुक्मिणीवरा ॥ दर्शनमात्रें नारी नरां ॥ पावन सत्वरा करिसी

पें ॥ ९ ॥ ऐसा तुझा अपार महिमा ॥ संक्षेपें वर्णितां भागे ब्रह्मा ॥ तेथें मानवां किती उपमा ॥ म्हणूनि सीमा न करवे ॥ १० ॥ सकळां आश्रय तुझे पाय ॥ म्हणूनि पिपीलिका कळसासी जाय ॥ पूर्व वराचा आजि प्रत्यय ॥ दिसे सर्वार्थीं आगळा ॥ ११ ॥ मूका पढे वेदसार ॥ पंगू चढे नगाशिखर ॥ ऐसा कृपेचा थोर बडिवार ॥ पुराणें साचार वर्णिती ॥ १२ ॥ तुझिये कृपें मम मानस ॥ प्रसवो उत्तम कथा फळास ॥ तुझिये कृपें बुद्धि विलास पावो सर्वदा तव गुणीं ॥ १३ ॥ आतां भावें पार्वती रमणा ॥ नमन पावो तुझिये चरणा ॥ श्रोता वक्ता करणी नाना ॥ तुझी तूंचि सांभाळीं ॥ १४ ॥ पूर्णानंदा पूर्णपणीं ॥ तूंच नांदसी अंतःकरणीं ॥ म्हणोनि दासांची शिराणी ॥ पूर्ण होय तव कृपें ॥ १५ ॥ भक्ति भावें बोलतां बोल ॥ द्वैत म्हणोनि वाटती फोल ॥ व्याप्य व्यापक समग्र खेळ ॥ तुझिये अंगीं दातारा ॥ १६ ॥ आतां नमूं संत सज्जन ॥ जे चातुर्य जळींचे मीन ॥ पूर्णानंद पूर्ण ज्ञान ॥ परम पावन सर्वांसी ॥ १७ ॥ आतां माता पितर गुरुचरण ॥ तयांसि करूनि भावें नमन ॥ पांडव स्वर्गारोहणाख्यान ॥ प्राकृत भाषें वर्णितों ॥ १८ ॥ वैशंपायनें जन्मेजया प्रती ॥

कथन केलें असे भारतीं ॥ तयाच्या श्रवणें सर्व जगतीं ॥ उत्तम ख्याती होतसे ॥ १९ ॥ तरी आतां श्रोते सज्जनीं ॥ सावध व्हावें श्रवणालागुनी ॥ हीच माझी जोडूनि पाणी ॥ असे विनवणी सर्वांसी ॥ २० ॥ ऐका तुम्ही पुण्यपावन ॥ भारतींचा इतिहास संपूर्ण ॥ स्वर्गारोहण पर्व येथून ॥ कथा असे चालिली ॥ २१ ॥ प्रत्यहीं एक पर्व कथा ॥ वैशंपायन सांगे परीक्षितीसुता ॥ त्याची प्रचीती नृपनाथा ॥ विश्वास बैसलासे ॥ २२ ॥ ऐसी पुण्यपावन कथा हे ॥ सत्रा दिवस चालली आहे ॥ तितुकें कापड शुद्ध होय ॥ सत्रा ब्राह्मण ऊठिले ॥ २३ ॥ एक हात असे उरला ॥ एक ब्राह्मण असे राहिला ॥ तंव दिवस उगवला ॥ अठरावा तो ॥ २४ ॥ विधिपूर्वक स्नान करूनी ॥ उभयतां बैसले असती आसनीं ॥ अठरावें पर्व येथूनी ॥ स्वर्गारोहण चालिलें ॥ २५ ॥ मग ऋषी झाला बोलता ॥ अगा राजा परीक्षितिसुता ॥ परियेसीं तूं पूर्वजांची कथा ॥ ऐकतां नासती ब्रह्महत्त्या ॥ २६ ॥ ऐसें म्हणे जन्मेजयास ॥ तंव तो म्हणे वैशंपायनास ॥ काय उत्तीर्ण उपकारास ॥ मी होऊं स्वामिया ॥ २७ ॥ जी मज दोषावेगळें केलें ॥ पातकापासूनि सोडविलें ॥ स्वर्गारोहण कैसें

झालें ॥ तें सांगाजी मज आतां ॥ २८ ॥ मग ऋषी सांगे राजा प्रत ॥ कौरव निमाल्यावरी समस्त ॥ पंडुपुत्र राज्य करीत ॥ हस्तिनापुरीचें ॥ २९ ॥ तैं सकळ लोक पाहीं ॥ श्रीमंतपणें नांदती गृहीं ॥ तेथींचें सुख मी सांगूं कायी ॥ अनुपम्य अलौकिक ॥ ३० ॥ नागरिक लोक आनंदेंसीं ॥ वागती सकळ एकचित्तेसीं ॥ परस्परें कोण कोणासी ॥ नेणतीच वैर भाव ॥ ३१ ॥ विवाद नाहींच कोणासी ॥ महा प्रीति एकमेकांसी ॥ जीव जाती सकळ नरांसी ॥ अधिक आवडती जीवाहुनी ॥ ३२ ॥ गोब्राह्मणांचें होय पाळण ॥ दुःख दरिद्रें गेलीं पळून ॥ अत्यंत सुखें सर्वही जाण ॥ आज्ञा पाळिती धर्माची ॥ ३३ ॥ लोकांसि कृष्णकथा निरंतर ॥ अन्य नावडे कांहीं विचार ॥ सदा फुलूनि सर्व तरुवर ॥ अतिपाडें वोथंबती ॥ ३४ ॥ सरिता वाहती पूर्ण जळें ॥ निर्वैर श्वापदें पक्षिकुळें ॥ भय उठोनि गेलें सगळें ॥ सदा सुमंगल लोक तेथें ॥ ३५ ॥ काय सांगूं हस्तिनापुरी ॥ उपमा न साहे अमर नगरी ॥ ऐसें त्रिभुवना भीतरी ॥ पाहतां सुख नाहींच ॥ ३६ ॥ थोर सुख जगासी झालें ॥ कौरवांचें नाम बुडालें ॥ धर्मनीतीं राज्य सगळें ॥ सदा पाळी धर्मराज ॥ ३७ ॥ मग त्या पंडुकुमरें पाहें ॥ वोळंगण केलें भूमंडळींचे राये ॥ विदुर

धृतराष्ट्र गांधारी वडील होय ॥ पांडव मानिती पितृत्वें ॥ ३८ ॥ धृतराष्ट्र आणि गांधारी ॥ त्यांची धर्म सेवा करी ॥ त्यांसि मानी बहुतां परी ॥ जैसीं मातापितरेंची ॥ ३९ ॥ कीं तिहीं पुत्र दुःख न करावें ॥ आनंदमय सदा असावें ॥ कालक्रमण विनोदें करावें ॥ क्रीडा कौतुकेंसी ॥ ४० ॥ तयाचें रात्रीं शयनसंधी ॥ अंग मर्दन करी द्रौपदी ॥ परी तीं न मानिती विरोधी ॥ सुख न साहे मानसी ॥ ४१ ॥ उभयतीं नाना भोग भोगिती ॥ परी तें दुःखचि समस्त मानिती ॥ सदा आपुल्या हृदयीं वाहती ॥ दुःख पांडवा कारणें ॥ ४२ ॥ ते जरी करीती आदर ॥ तरी धृतराष्ट्र वाहे वैर ॥ सदा हृदयीं धुधुःकार ॥ वोखटें इच्छितसे ॥ ४३ ॥ स्वपुत्रांचे दुःख भारी ॥ बैसलें धृतराष्ट्रचे अंतरीं ॥ सदा भावीतसे सत्वरी ॥ क्षय पांडवांचा ॥ ४४ ॥ जैं पांडव जाती मरोन ॥ तैं आपुले त्यागूं प्राण ॥ ऐसें करिती सदा चिंतन ॥ धृतराष्ट्र आणि गांधारी ॥ ४५ ॥ धर्मराज तो अति पवित्र ॥ लोक मुखें गाती सर्वत्र ॥ परीक्षिती तो उत्तरापुत्र ॥ महावीर अभिमानी ॥ ४६ ॥ तो धर्माचा नातू पाहे ॥ युधिष्ठिर राज्य करिताहे ॥ तंव कलीची साउली लवलाहें ॥ पडली भूमंडळीं ॥ ४७ ॥ तेणें धर्माचे देहीं ॥ नाना विकार

उठती हृदयीं ॥ परी महासागर जैसा पाहीं ॥ न सांडीच मर्यादा ॥ ४८ ॥ नानापरीचे उमाळ ॥ उठती पातकांचे कल्लोळ ॥ तेणें धर्माचें मन व्याकुळ ॥ होतसे राया जाण पां ॥ ४९ ॥ मग धर्में काय केलें ॥ कुंति बंधूंसि बैसविलें ॥ आणि द्रौपदीसि बोलाविलें ॥ समस्तादि करूनियां ॥ ५० ॥ मंदिरीं बैसोनियां स्वस्थ ॥ धर्म सांगतसे वृत्तांत॥म्हणे माझें चित्त दुश्चित्त ॥ कां बापा ऐसें जाहलें ॥ ५१ ॥ नाना दुःखचिन्हें होती ॥ भय वाटतसे चित्तीं ॥ महा मोहें पडे भ्रांती ॥ ऐसियासी काय कीजे ॥ ५२ ॥ नानापरि करितों चिंतन ॥ परी स्वस्थ नाहीं माझें मन ॥ तंव द्रौपदी बोले काय वचन ॥ धर्मापासीं परियेसा ॥ ५३ ॥ स्वामी अंतरींची खूण ॥ दुसऱ्यासि न कळे कृष्णाविण ॥ ऐसें तियेचें तें वचन ॥ सकळांसी मानवलें ॥ ५४ ॥ मग धर्में चिंतितां कृष्णासी ॥ हरी आला हस्तनापुरासी ॥ नगर पाहतां चौफेरेंसी ॥ शृंगारिलें असे पैं ॥ ५५ ॥ जैसी केवळ द्वारका नगरी ॥ तैसी शृंगारिली हस्तनापुरी ॥ गुढ्या तोरणें घरोघरीं ॥ उभारिलीं असती पां ॥ ५६ ॥ शोभा अनुपम्य नगरीची ॥ काय महिमा वर्णूं तेथींची ॥ हरि आणि पांडवांची ॥ भेटी

6

अध्याय-१ला पृष्ठ-४

जाहली तेधवां ॥ ५७ ॥ महा हरुषें आली कुंती ॥ झाली श्रीपतीसी भेटती ॥ म्हणे उपकार तुझे किती ॥ वानूं मी बा श्रीकृष्णा ॥ ५८ ॥ तवोपकार वर्णन लिहितां ॥ न पुरे ही पृथ्वी समस्ता ॥ ते मी वाचेसी आणितां ॥ कैसी समर्था होईन ॥ ५९ ॥ पांडवांचा अंगिकार केला ॥ आपुला पण सिद्धीसी नेला ॥ बापा स्नेहाळा कष्टी झाला ॥ किती आम्हां कारणें ॥ ६० ॥ जेथें संकट पडलें पांडवांसी ॥ तेथें तूं पावलासि हृषीकेशी ॥ तंव श्रीकृष्ण आणि कुंतीसी ॥ क्षेम आसवें सूटलीं ॥ ६१ ॥ कुंतीचें ऐकून वचन ॥ धर्माचें गहिंवरलें मन ॥ सद्गदित कंठ होऊन ॥ अंगीं रोमांच ऊठलें ॥ ६२ ॥ शब्द न वदवे वैखरीसी ॥ मौनेंच लागला चरणासी ॥ आसवें धुतलें हरिपदासी ॥ तेवेळीं परियेसा ॥ ६३ ॥ मग देवें धर्मासि उचलिला ॥ प्रेमें प्रीतिं आलिंगिला ॥ जेविं दीपासि दीप मिळाला ॥ तंव जाहलें एकरूप ॥ ६४ ॥ वृक्षीं छाया निवडे जैसी ॥ तैसें क्षेम सुटलें दोघांसी ॥ तंव भीम येऊनि प्रेमेंसि ॥ कृष्णासी भेटला आदरें ॥ ६५ ॥ जैसी सरिता शीघ्र वाहे ॥ आणि सिंधूसी मिळे लवलाहें ॥ तैसा आदरें शीघ्र पाहे ॥ भीम भेटला कृष्णासी ॥ ६६ ॥ भीम म्हणे गा अनंता ॥

सांभाळिलें त्वां शरणागता ॥ आम्ही तव गोपीनाथा ॥ शरणागत तूंतें असों ॥ ६७ ॥ तूं आमुचा माय बाप हरी ॥ तेणें तरलों बरविया परी ॥ नानाविध आमुचे वैरी ॥ तुम्हीं निर्दाळिलेती ॥ ६८ ॥ ऐसें बोले भीमसेन ॥ तंव पार्थ उभा कर जोडून ॥ चरणावरी लावूनियां नयन ॥ भेटीलागीं उभा असे ॥ ६९ ॥ भीमाचें क्षेम सुटतां जाण ॥ पार्थें धांवूनि धरिले चरण ॥ मग कृष्णें उचलोनि आलिंगन ॥ आनंदें दीधलें तयासी ॥ ७० ॥ मग अर्जुन म्हणे गा देवा ॥ काय उपकार वर्णूं केशवा ॥ तुवां आपुल्या जीवींचा ठेवा ॥ दीधला मजकारणें ॥ ७१ ॥ जेणें मजसी सनाथ केलें ॥ या भवार्णवापासून सोडविलें ॥ तेथें येर काय उरलें ॥ थोर बा हा उपकार ॥ ७२ ॥ ऐसें जंव विनवी पार्थ ॥ तंव असे नकुळ वाट पहात ॥ कृष्णचरण अवलोकित ॥ उतावेळ भेटीलागीं ॥ ७३ ॥ जंव पार्थाचें क्षेम सुटलें ॥ धांवोनि नकुळें आलिंगिलें ॥ तैं अत्यंत दुणावलें ॥ प्रेम तेथें उभयतांचें ॥ ७४ ॥ नकुळ असतां क्षेम देत ॥ सहदेव असे वाट पाहत ॥ श्रीकृष्ण भेटीसि उद्युक्त ॥ उतावेळ झाला सप्रेमें ॥ ७५ ॥ तें हरीनें जाणीतलें ॥ मग सहदेवासी खुणाविलें ॥ तंव क्षेम सोडितां नकुळें ॥ भेटी दीधली सहदेवा

॥ ७६ ॥ तेणें सहदेव आनंदला ॥ थोर आल्हाद सकळांसि झाला ॥ तंव द्रौपदीनें येतां देखिला ॥ हरि मंदिरांत ॥ ७७ ॥ तैं द्रौपदी आली धांवून ॥ कृष्णासी केलें निंबलोण ॥ मग थोर प्रेमेंकरून ॥ भेटी झाली भावंडांसी ॥ ७८ ॥ द्रौपदी म्हणे दादा भागला ॥ माझा कैवारी असे आला ॥ अवतरोनियां तुवां केला ॥ आम्हांवरी उपकार ॥ ७९ ॥ तुझिया उपकाराची राशी ॥ काय वर्णूं हृषीकेशी ॥ मुळींहूनि त्वां आम्हांसी ॥ रक्षिलें असे देवदेवा ॥ ८० ॥ आम्हां जेथें पडे अडचणी ॥ तेथें येसी धांवूनी ॥ सकळ निस्तारलों तुझेचेनी ॥ दादा तारू तूं माझें ॥ ८१ ॥ असो आतां विस्तार बहुत ॥ सुभद्रेसी भेटला अनंत ॥ नगर लोक समस्त ॥ कृष्णदर्शनें आनंदले ॥ ८२ ॥ मग धर्में षोडशोपचारेंसी ॥ पूजूनियां श्रीकृष्णासी ॥ मग सारोनियां भोजनासी ॥ सुख गोष्टींसी बैसले ॥ ८३ ॥ धर्म म्हणे हृषीकेशी ॥ तूं माय बाप आम्हां होसी ॥ आम्ही जीवें सर्व भावेंसी ॥ अंकित असों तुझें पैं ॥ ८४ ॥ ऐसी करूनियां स्तुती ॥ मग सांगे जीवींची खंती ॥ जी दुष्ट दुर्बुद्धी चित्तीं ॥ उठतसे निरंतर ॥ ८५ ॥ मग ज्ञानें पाहे अनंत ॥ तंव कली असे डोकावीत ॥ मग धर्मासि म्हणे कृष्णनाथ ॥ थोर विघ्न

उदेलें ॥ ८६ ॥ दचक पडला पांडवांसीं ॥ तें काय देवा हृषीकेशी ॥ मग देव म्हणे कलीसी ॥ प्रवेश झाला असे हो ॥ ८७ ॥ मग भीमसेन बोलता होई ॥ तयासी मी मारीन पाहीं ॥ तुम्ही आम्हां असतां भय काई ॥ चूर्ण करीन गदाघातें ॥ ८८ ॥ आम्हां सारथी असतां हरी ॥ कली आमुचें काय करी ॥ तंव भीमासि म्हणे श्रीहरी ॥ कली आम्हासी अनिवार ॥ ८९ ॥ हें ठाईंच असे निर्मिलें ॥ कलीचें राज्य असे जाहलें ॥ धर्मराज्य असे लोपलें ॥ येथूनियां जाण पां ॥ ९० ॥ कलीचा होतांचि प्रवेश ॥ धर्मासि ठाव नाहींच लेश ॥ एवं प्रकारें हृषीकेश ॥ धर्मरायासी सांगतसे ॥ ९१ ॥ मग धर्म म्हणे तुम्ही श्रीपती ॥ असतां आम्हांसि काय भीती ॥ ऐसें ऐकोनि महा खंती ॥ आली नारायणासी ॥ ९२ ॥ तेणें धर्म होऊनि भयभीत ॥ कृष्णासी असें कीं विनवित ॥ कलीचा पुसतां वृत्तांत ॥ खंती वाटे कां देवा ॥ ९३ ॥ मग कृष्ण म्हणे धर्मासी ॥ हीच खंती वाटते मानसीं ॥ कीं प्रवेश होतां कलिरायासी ॥ धर्माचा नाश होईल ॥ ९४ ॥ कलियुग महा दारुण ॥ ब्राह्मण सांडितील देवतार्चन ॥ गायत्री मंत्र सांडून ॥ नाना जपतील कुमंत्र ॥ ९५ ॥ ईश्वरभजन सांडितील ॥

शालिग्राम न पूजितील ॥ भजनविधी करितील ॥ भूत प्रेत पिशाचांचा ॥ ९६ ॥ आपुला धर्म सांडितील ॥ सेवा नीचांची करितील ॥ अन्याय मार्गें चालतील ॥ प्रतिग्रह घेतील नीचांचे ॥ ९७ ॥ नारी पतिभक्ति सांडितील ॥ सदा व्यभिचार करितील ॥ परधर्म मार्गें चालतील ॥ सकळ लोक पृथ्वीवरी ॥ ९८ ॥ पुरुष सांडितील कुलांगना ॥ दासी वेश्यांसी जातील जाणा ॥ द्रव्य मदें उन्मत्त नाना ॥ क्षितीवरी चतुर्वर्ण ॥ ९९ ॥ गुरूतें न मानितील शिष्य ॥ सेवक न मानितील स्वामीस ॥ असत्य सकळ बोलतील ॥ करितील नाना पातकें ॥ १०० ॥ सिद्ध मंत्र न फळतील ॥ कुमंत्र फळासि येतील ॥ सिद्ध मंत्र लोपतील ॥ पाखंडें उठतील दारुण ॥ १०१ ॥ वचन राजे न पाळितील ॥ मेघ काळीं न पडतील ॥ धरित्री पीक सांडील ॥ आणि सुकतील महा नद्या ॥ १०२ ॥ कलींतील भक्षितां अन्न ॥ लोक न मानितील पाप पुण्य ॥ पापोपपातकें संपूर्ण ॥ उठतील कलीमाजीं ॥ १०३ ॥ कलीचा वारा लागतां ॥ सत्य मुळींच बुडेल तत्वतां ॥ असत्याची वाढेल महंता ॥ सर्वत्र होतील अधर्म ॥ १०४ ॥ आतां असो हें कथन ॥ धर्माधर्म लपतील जाण ॥ आतां न रहावें आपण ॥ कलियुगामाझारीं ॥ १०५ ॥ आतां

आम्हीं जाऊं निज धामा ॥ हेचि भेटी तुम्हा आम्हा ॥ ऐसें वचन ऐकतां धर्मा ॥ मूर्च्छना पैं आली ॥ १०६ ॥ पांडव रुदन पैं करीत ॥ थोर होतसे आकांत ॥ नानापरीचे शोक करीत ॥ सकळ जन तेधवां ॥ १०७ ॥ ललाट पिटी द्रौपदी सती ॥ थोर मानें आक्रंदती ॥ अहा देवा श्रीपती ॥ तारूं कां हें बुडविसी ॥ १०८ ॥ ऐसें देवा काय केलें ॥ लौकरचि पहा कां विघ्न आलें ॥ मग देवें सावध केलें ॥ युधिष्ठिरासीं ॥ १०९ धर्मराज म्हणे गा हरी ॥ हें कां विचारिलें त्वां लौकरी ॥ पुढें आमुची काय परी ॥ होईल बा स्वामिया ॥ ११० ॥ तंव बोले हृषीकेशी ॥ म्यां जीवींचा विचार सांगितला तुम्हासी ॥ परी हें प्रगट जीवेंसी ॥ होऊं न द्यावें सर्वथा ॥ ११ ॥ मग ते करुणा गोपाळें केली ॥ सुख गोष्टीं रजनी क्रमिली ॥ तंव प्रभातीं उदयाचळीं ॥ दिनकर उगवलासे ॥ १२ ॥ मग हरी काय करिता झाला ॥ सकळ नित्यनेम सारिला ॥ आणि सिद्ध होऊनि बैसला ॥ तंव आला विदुर तेथें ॥ १३ ॥ मग नमस्कारिलें देवासी ॥ बैसकार केला सभेसी ॥ मग विदुराप्रती हृषीकेशी ॥ काय बोलतां पैं झाला ॥ १४ ॥ अगा कलियुग प्रवेशतां पाहीं ॥ अधर्म उठितो लवलाहीं ॥ तोचि काळ

12

हा येसमयीं ॥ प्राप्त झाला असे बा ॥ १५ ॥ आतां तुम्हीं एक करावें ॥ हस्तिनापुरींत न राहावें ॥ वेगीं येथूनियां जावें ॥ बद्रिकाश्रमासी ॥ १६ ॥ तेथें मना होईल समाधान ॥ नित्य करावें आमुचें चिंतन ॥ ऐसें हरि बोलतां वचन ॥ विदुर गोष्टीसी मानवला ॥ १७ ॥ तो रावो ज्ञानियांचा ॥ भाव कळला श्रीकृष्णाचा ॥ तो प्रेमा या उभयतांचा ॥ कोणी जाणावा ॥ १८ ॥ जैसें जीवन मिळोनि जाय ॥ तेथें निवडितां भेद काय ॥ तैसें ते एकमेकां होय ॥ आत्मत्वें समरसती ॥ १९ ॥ परी ऋषी भाष्यें म्हणोन ॥ तैसे निमाले दोघे जण ॥ जेवीं एके दीपीं ज्योति दोन ॥ परी प्रकाश एकची ॥ १२० ॥ मग तो कृष्ण हृषीकेशी ॥ आलिंगन दे कुंति द्रौपदीसी ॥ आणि परीक्षितीतें पोटासी ॥ धरिता झाला प्रेमानें ॥ २१ ॥ द्रौपदीसी देतां आलिंगन ॥ तियेनें मांडिलें असे रुदन ॥ मग करूनि समाधान ॥ संबोखिली तियेसी ॥ २२ ॥ मग पुसोनि धृतराष्ट्र गांधारीसी ॥ बाहेर आले हृषीकेशी ॥ तंव तेथें सिद्ध रथासी ॥ केलें असे दारुकें ॥ २३ ॥ मग नगरीचे लोक समस्त ॥ देवासि येती बोळवित ॥ देव तयांसी राहवित ॥ प्रीति आदरें करूनियां ॥ २४ ॥ बा तें नगर देवाचें ॥

सकळांसी सख्यत्व कृष्णाचें ॥ कोण भाग्य नागरिकांचें ॥ देव सकळां ओळखितो ॥ २५ ॥ ऐसे लोक राहविले समस्त ॥ पांडव येती बोळवित ॥ देव क्षेम देऊनि राहवित ॥ धर्म भीम नकुळ सहदेवांसी ॥ २६ ॥ मग धर्म म्हणे अर्जुनासी ॥ तूं बोळवित जावें द्वारकेसी ॥ तंव दारुकें आणिलें रथासी ॥ तो सारथी कृष्णाचा ॥ २७ ॥ मग अर्जुनाचा रथ जाण ॥ सात्विक घेऊनि आला आपण ॥ मग नारायण आणि अर्जुन ॥ बैसलें रथीं आपुलिया ॥ २८ ॥ आज्ञा मागूनि समस्तांसी ॥ सारथी हांकिती रथवारूंसी ॥ ऐसे हरि पार्थ द्वारकेसी ॥ चालिले असती दोघेही ॥ २९ ॥ गुजगोष्टी बोलती दोघे जण ॥ परी चित्ता नसे समाधान ॥ यापरी देव आणि अर्जुन ॥ त्वरें आले द्वारकेसी ॥ १३० ॥ भेटी जाहली सहोदरांसी ॥ कृष्ण आणि बळिभद्रासीं ॥ तैसाचि अर्जुनासी ॥ भेटला बळिराम ॥ ३१ ॥ उद्धव अक्रूर उग्रसेन ॥ कृष्णासि भेटले येऊन ॥ तैसेचि अर्जुनालागून ॥ आलिंगिते जाहले ॥ ३२ ॥ ऐसे सकळ यादवांसी ॥ भेटले पार्थ हृषीकेशी ॥ परी अंतरींचें गुह्य तयांसी ॥ कळों नेदी गोपिनाथ ॥ ३३ ॥ ही भेटि झाल्यापासून ॥ अवघियांचें होय कल्याण ॥ म्हणोनि तो

नारायण ॥ सकळांसी क्षेम देत ॥ ३४ ॥ द्वारकावासी नारी नरांसी ॥ आनंद जाहला असे मानसीं ॥ आणि पशु पक्ष्यादि जीव जातींसी ॥ सुख सकळांसी जाहलें ॥ ३५ ॥ आतां कथा येथून ॥ काय सांगे वैशंपायन ॥ तरी ते कथा श्रोतियांलागुन ॥ नामा सांगे विष्णुदास ॥ १३६ ॥ इति श्रीमन्महाभारते स्वर्गारोहणपर्वणि प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥

॥ इति प्रथमोऽध्याय समाप्त ॥




# अध्याय - दुसरा

## ओव्या - १३९

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ मग वैशंपायन म्हणे रायासी ॥ पुढील कथा परियेसीं ॥ कृष्ण येऊन द्वारकेसीं ॥ महोत्सव मांडिला ॥ १ ॥ अवताराचें जें कारण ॥ तें येथोनि झालें संपूर्ण ॥ हें सकळ श्रीकृष्णालागून ॥ विदित झालें अंतरीं ॥ २ ॥ यालागीं तो अनंत ॥ नानापरीचीं दानें देत ॥ द्वारकेचे लोक समस्त ॥ भोगिती सुख आनंदें ॥ ३ ॥ ऐसें असतां आनंदघन ॥ ब्रह्मा आला स्वर्गाहून ॥ एकांत वेळ पाहून ॥ हरिलागीं भेटला ॥ ४ ॥ म्हणे अवतारकृत्य सर्व झालें ॥ कलियुग आतां प्रवर्तलें ॥ तरी तुम्हीं चलावें वहिलें ॥ निजधामासी श्रीकृष्णा ॥ ५ ॥ अवधी झाली आयुष्यासी ॥ अधिक वर्षे जाहलीं पंचवीस ॥ आठव जाहला देवांस ॥ वाट तुमची पाहताती ॥ ६ ॥ मग म्हणे हृषीकेशी ॥ हें ठाउकें आहे आम्हासी ॥ तुम्ही सांगावें सर्वांसी ॥ सत्वराचि येतों म्हणूनी ॥ ७ ॥ ऐसें वचन ऐकतां जाण ॥ विरिंची निघाला तेथून ॥ द्वारकेंत श्रीहरीलागुन ॥ नाना दुश्चिन्हें जाणविती ॥ ८ ॥ उगीच मही असे कांपत ॥ अंधकारें दिशा दाटत ॥ नक्षत्रें तुटोनि सदा पडत ॥ अकस्मात भूमीवरी ॥ ९ ॥ नभ जाहलेंसे आरक्त ॥ आकाशामाजी तडक फुटत ॥ नानापरीचीं विघ्नें उठत ॥

द्वारकेमाजीं जनांसी ॥ १० ॥ हरी विचारी स्वमानसीं ॥ कीं संख्या पुरली अवतारासी ॥ म्हणोनि दुश्चिन्हें द्वारकेसी ॥ भयानक उठती हीं ॥ ११ ॥ मग बोलावून ब्राह्मण ॥ तयांसी बोले नारायण ॥ या दुश्चिन्हांचें निरसन ॥ होय तें कारण मज सांगा ॥ १२ ॥ ब्राह्मण म्हणती देवाधिदेवा ॥ पुण्यक्षेत्रीं धर्म करावा ॥ तैं उपद्रव हा आघवा ॥ शांत होईल निश्चयें ॥ १३ ॥ हरिसी वाटे आश्चर्य पूर्ण ॥ परी नुलंघी ब्राह्मण वचन ॥ मग प्रभास क्षेत्रीं जाऊन नाना दानें देतसे ॥ १४ ॥ अश्वदान गजदान ॥ अन्न वस्त्र भूमि कांचन ॥ आणि गोरत्नादि अनंत दान ॥ शास्त्राप्रमाणें देतसे ॥ १५ ॥ इकडे दानें देतसे अनंत ॥ तों द्वारकेंत काय जाहला वृत्तांत ॥ यादव चेष्टा करूं जात ॥ एके अंध ऋषीची ॥ १६ ॥ सांबाचिया पोटासी ॥ गदें बांधिलें काथवटीसी ॥ तों तयेचे पृष्ठ भागासी ॥ लोहखिळा एक असे ॥ १७ ॥ स्त्रियेचें सोंग घेतलें ॥ संगें निघालीं यादवांची मुलें ॥ जाऊन ऋषिलागीं बोले ॥ काय होईल बाळक मज ॥ १८ ॥ ब्राह्मण विचारून पाहे ॥ म्हणे जें कां तुझे पोटीं आहे ॥ तेंचि निश्चयें करील क्षय ॥ कृष्णासहित यादवांचा ॥ १९ ॥ ऐकतां ऋषीचिया बोला ॥ भय उपजलें यादवांला ॥

तों धर्माकडून हरि आला ॥ तेच वेळे द्वारकेसी ॥ २० ॥ तंव तें ऋषींचें वचन ॥ हरीस सांगती यादव येऊन ॥ मग म्हणे तो नारायण ॥ अन्यथा जाण नव्हे हें ॥ २१ ॥ परी एक बुद्धी करावी येथ ॥ जेणें ऋषिवाक्य होईल अत्य ॥ मग भालुकातीर्थी जाऊन त्वरित ॥ काथवट घांसली खडकावरी ॥ २२ ॥ तिचा जो निघाला फेंस ॥ तो लागला दोहीं थडीस ॥ खिळा होता काथवटीस ॥ तो उदकडोहीं बुडाला ॥ २३ ॥ यादव कुमर आनंदले ॥ आतां ऋषिवचन काय झालें ॥ द्वारकेमाजी येऊन वहिले ॥ सदनीं गेले आपुलिया ॥ २४ ॥ इकडे त्या जळांत ॥ मीन खेळत होते बहुत ॥ एकें तो खिळा गिळिला त्वरित ॥ आहार आपुला म्हणवोनी ॥ २५ ॥ तों तेथें एक पारधी आला ॥ तीरीं पारध खेळूं लागला ॥ तोचि मीन सांपडला ॥ जळामाजीं अकस्मात ॥ २६ ॥ मीनाचें पोट विदारिलें ॥ तों लोखंड तयासी सांपडलें ॥ म्हणे भलें सळ हें मिळालें ॥ मग लाविलें बाणमुखीं ॥ २७ ॥ तो पाहूं जातां धीवर ॥ वाळीचा असे अवतार ॥ उसनें घ्यावया सत्वर ॥ आलासे राम अवतारींचा ॥ २८ ॥ ऐकोनि ऋषीचिया बोला ॥ जन्मेजयानें प्रश्न केला ॥ वाळी उसणें घेऊं आला ॥ तें काय

स्व. रो.

१० ॥

कारण असे जी ॥ २९ ॥ याकारणें मजलागुन ॥ स्वामी सांगा पूर्व कथन ॥ मग ऋषि बोले वचन ॥ ऐकें सावधान जन्मेजया ॥ ३० ॥ श्रीरामाची सीता घेऊन ॥ गेला होता दशानन ॥ तियेचे शुद्धीलागुन ॥ राम पातला किष्किंधे ॥ ३१ ॥ तेथें वालि सुग्रीव वानर ॥ दोघे असती सहोदर ॥ ते किष्किंधेचे नृपवर ॥ करिती राज्य स्वप्रतापें ॥ ३२ ॥ रुमा सुग्रीवाची राणी ॥ ते वाळीनें अभिलाषोनी ॥ ठेवितां सुग्रीव रामालागुनी ॥ शरण गेला साक्षेपें ॥ ३३ ॥ वृत्तांत अवघा सांगितला ॥ कीं वाळीनें हरिलें मम दारेला ॥ श्रीरामा त्वां वधूनि त्याला ॥ भार्या देईं माझी मज ॥ ३४ ॥ तों एकेचि बाणेंकरूनी ॥ विंधूनि पाडावा पापखाणी ॥ तरीच तो तुम्हांलागुनी ॥ साध्य होय श्रीरामा ॥ ३५ ॥ तो आणिकांतें न मरे जाण ॥ अवघड आहे त्याचें मरण ॥ सात ताड उंच पूर्ण ॥ दुर्गामाजी आहेती ॥ ३६ ॥ ते एकेच बाणेंकरून ॥ जो वीर छेदील संपूर्ण ॥ त्याचे हातें वाळीचें मरण ॥ कथिलें असे विधीनें ॥ ३७ ॥ एवं ऐकतां वचनासी ॥ राम गेला किष्किंधेसी ॥ सीत चढवोनि कोदंडासी ॥ बाण गुणासी लाविला ॥ ३८ ॥ शेष अवतार लक्ष्मण ॥ जाणोनियां रघुनंदन ॥ तयासी जवळ

4

बोलाऊन ॥ ठाण मांडिलें रघुनाथें ॥ ३९ ॥ धनुष्य ठेऊन चरणावरी ॥ भूमीस दडपून आहटन करी ॥ शेष कापोनी झडकरी ॥ ताडांची हारिसम झाली ॥ ४० ॥ मग एकच बाणेंकरून ॥ रामें केलें संधान ॥ ताडसप्तक छेदोन ॥ भूमीवरी पाडिले ॥ ४१ ॥ तों वाळी युद्धासि धांविन्नला ॥ सुग्रीव तयासी भिडता झाला ॥ रामें अकस्मात बाण टाकिला ॥ वाळी निमाला क्षणार्धें ॥ ४२ ॥ गुप्त रूपें वाळीस मारिला ॥ तारा रुमा दिधल्या सुग्रीवाला ॥ राज्यपद देऊनि त्याला ॥ संतोषविला रघुवीरें ॥ ४३ ॥ तोचि राम हा श्रीकृष्ण ॥ वाळी तो झाला धीवर जाण ॥ आपलें उसणें घ्यावया कारण ॥ भालुकातीरा पातला तो ॥ ४४ ॥ ऐसें ऐकोनि ऋषीच्या बोला ॥ राव मानसीं संतोषला ॥ म्हणे माझा संशय फिटला ॥ कथा बोला पुढें आतां ॥ ४५ ॥ वैशंपायन म्हणे जन्मेजयास ॥ राया ऐकें तूं सावकास ॥ म्हणोनि तें सलभालीस ॥ घातलें असे धीवरानें ॥ ४६ ॥ मग ह्या नदीचे आंत ॥ काथवटीचा फेंस वाहत ॥ दोंहीं कडेसी लागत ॥ तों पानगवत झालें त्याचें ॥ ४७ ॥ कणसें आलीं तयालागोनि ॥ नदी भयानक दिसे नयनीं ॥ इकडे द्वारकेंत शारंगपाणी ॥ विचार करिता झाला पैं ॥ ४८ ॥

यावरी तो कृष्णनाथ ॥ सभा करी द्वारकेंत ॥ यादवां बैसवोनि समस्त ॥ नगरवासी बोलाविले ॥ ४९ ॥ उग्रसेन वसुदेवासी ॥ वडिल बंधु बळिभद्रासी ॥ उद्धव आणि अक्रूरासी ॥ सभास्थानीं बैसविलें ॥ ५० ॥ त्यांसी म्हणे शारंगधर ॥ आतां सरला आमुचा अवतार ॥ तुम्ही पहा आपुला विचार ॥ कळल तैसा सर्वही ॥ ५१ ॥ गहिंवर दाटला सर्वांसी ॥ कां रे देवा असें वदसी ॥ तुजवांचोनि आम्हां दीनांसी ॥ कोण रक्षील सांग पां ॥ ५२ ॥ नानापरी आकांत करिती ॥ एकमेकांचे गळां पडती ॥ ऐसें देवा श्रीपती ॥ कां त्वां चित्तीं विचारिलें ॥ ५३ ॥ तुझे संगतीं आम्हीं देवा ॥ सर्व सुखाचा भोगिला ठेवा ॥ आतां तुझी परी जे माधवा ॥ तेचि परी आमुची ॥ ५४ ॥ मग अक्रूरासि म्हणे श्रीपती ॥ वसुदेव देवकी वृद्ध असती ॥ त्यांसि घेऊन बद्रिकाश्रमाप्रती ॥ सत्वर जावें आतां त्वां ॥ ५५ ॥ ऐसें देव जेव्हां बोलिला ॥ आकांत तेव्हां एकचि जाहला ॥ कलियुगासी उदय पावला ॥ आणि उद्भवला ऋषिशाप ॥ ५६ ॥ तेव्हां होता वसंत मास ॥ यादव म्हणती एकमेकांस ॥ चला जाऊं भालुकातीर्थास ॥ स्नानालागीं सर्वही ॥ ५७ ॥ यादव निघाले समस्त ॥ उष्ण अंगें

अध्याय-दुसरा पृष्ठ-३२

7

जाहलीं तप्त ॥ उदक शिंपीती पैं त्वरित ॥ एकमेकांवरी साक्षेपें ॥ ५८ ॥ आरोळ्या मारिती भयंकर ॥ मद्यपानें जाहले क्रूर ॥ पानगवतें तोडोनि सत्वर ॥ युद्धालागीं प्रवर्तले ॥ ५९ ॥ भूल पडली सकळांसी ॥ पानें मारिती एकमेकांसी ॥ तेणें दुखंड केले धड शिरांसी ॥ छप्पन्न कोटींसी नाश जाहला ॥ ६० ॥ पानभाले जाहले क्रूर ॥ मरण पावले यादव समग्र ॥ शोणिताचा वाहे पूर ॥ भालुकातीर ताम्र जाहलें ॥ ६१ ॥ छप्पन्न कोटी यादवांसी ॥ संहार झाला परियेसीं ॥ तेचि वार्ता श्रीकृष्णासी ॥ श्रुत जाहली दूतमुखें ॥ ६२ ॥ कीं भालुकातीर्थाप्रत ॥ यादव निमाले पैं समस्त ॥ हा भोंवला असे त्वरित ॥ शाप ऋषीचा आम्हांतें ॥ ६३ ॥ मग तेथें जावोनि अनंत ॥ मनामाजी विस्मय मानित ॥ दुःखें होऊनियां मूर्च्छित ॥ धरणीवरी पडियेला ॥ ६४ ॥ लौकिकामाजी ऐसें दाविलें ॥ कीं हरीसी यादवांचें दुःख झालें ॥ म्हणूनि मूर्च्छेचें मिष घेतलें ॥ शयन केलें वडाखालीं ॥ ६५ ॥ तंव त्याच महावनांत ॥ कोळी पारध असे पाहत ॥ तों पद्म चमकलें देखत ॥ वाम चरणीं हरीच्या ॥ ६६ ॥ कोळीयानें संधान केलें ॥ म्हणे हें सावज थोर बैसलें ॥ म्हणोनि बाणातें मोकळिलें ॥ होतें सलत्या भालीसी

॥ ६७ ॥ तो बाण त्वरें करूनी ॥ येऊनि भेदला वाम चरणीं ॥ रक्त उसळलें तेथूनी प्रवाह थोर चालिला ॥ ६८ ॥ एक पंथ कार्यें दोन ॥ ऐसें हरीनें विचारून ॥ एकेचि खेपें फेडिलें ऋण ॥ पार्वती आणि वाळीचें ॥ ६९ ॥ वाळीनें बाण सोडिला ॥ रुधिराचा घट पूर्ण भरिला ॥ वचन सत्य करिता जाहला ॥ तया द्रौपदीरूपि पार्वतीचें ॥ ७० ॥ बाप सत्य वचनी भगवान ॥ बोलिला बोल खरा करून ॥ पांडव शरणांगत रक्षून ॥ दोन्ही ऋणें फेडिलीं ॥ ७१ ॥ अगा राया परीक्षिति सुता ॥ तुज आदिपर्वीं सांगितली कथा ॥ कीं पार्वती शंकर कांता ॥ पूजा करीत होती जैं ॥ ७२ ॥ ते समयीं तियेनें जाण ॥ पांडव घेतले मागोन ॥ वचनीं गोविला नारायण ॥ म्हणोनि सर्वदा रक्षीतसे ॥ ७३ ॥ आपुल्या देऊनि रुधिरासी ॥ पूर्ण भरिलें घटासी ॥ आतां असो या गोष्टीसी ॥ कथा परिसा पुढारा ॥ ७४ ॥ तंव राव असे विनवित ॥ स्वामी तुम्हीं बोलिला यथार्थ ॥ हरीनें भालुका तीर्थांत ॥ दोन्ही संकल्प उगविले ॥ ७५ ॥ धीवरें वेधिला श्रीकृष्ण ॥ कथा सांगावी तेथून ॥ तंव बोले वैशंपायन ॥ ऐकें जन्मेजया राजेंद्रा ॥ ७६ ॥ कृष्ण बाणें व्याकुळ जाहला ॥ तो तैसाचि

अध्याय - दुसरा पृष्ठ - १३

धरणीवरी पडिला ॥ थोर उल्कापात जाहला ॥ अवतार संपला म्हणूनी ॥ ७७ ॥ मग तो झाला हाहःकार ॥ म्हणती धीवरें मारिला शारंगधर ॥ पूर्वजन्मींचें होतें वैर ॥ म्हणूनि दुस्तर घडलें हें ॥ ७८ ॥ ऐसा बोल जगीं उठिला ॥ तों बळिभद्रासहित अर्जुन पातला ॥ सर्वेचि उद्धवही पावला ॥ उग्रसेनासमवेत ॥ ७९ ॥ पाहोनि श्रीकृष्णाची दशा ॥ थोर जाहला तेव्हां वळसा ॥ म्हणती हे देवा जगदीशा ॥ काय ऐसें केलेंरे ॥ ८० ॥ हृदयें ललाटें पिटिती ॥ अट्टहास्यें आक्रंदती ॥ महाशब्द नाना करिती ॥ आलिंगूनी धरिती कृष्णातें ॥ ८१ ॥ मग पार्थापाशीं मागोन हात ॥ उठोन बैसले कृष्णनाथ ॥ तैसेंच वोढोन घेतलें सत्व ॥ पार्थावीराचें सर्वही ॥ ८२ ॥ मग उद्धव म्हणे श्रीहरी ॥ कैसी केली नवलपरी ॥ हे सृष्टी कोणाचे आभारी ॥ श्रीमुरारी घातली त्वां ॥ ८३ ॥ आतां देवारे तुजवीण ॥ या जगातें उद्धरील कोण ॥ कैसें होईल याचें रक्षण ॥ आधार मोडला सर्वांचा ॥ ८४ ॥ मुनिजनांची मोडली छाया ॥ कल्पतरु गेला उन्मळूनियां ॥ कसें करावें देवराया ॥ तुजवीण आम्हीं सांग पां ॥ ८५ ॥ तुजवीण धर्म पोरका झाला ॥ विश्रांतीचा ठाव मोडला ॥ महासुखांचा थारा तुटला ॥ तुजवांचोनि

श्रीहरी ॥ ८६ ॥ कृष्णासारिखें निधान ॥ हातींचें चाललें निघून ॥ जळीं बुडालेंरे जें रत्न ॥ तें दिलिया प्राण सांपडेना ॥ ८७ ॥ जीवाची मोडली आस ॥ मनाचें दुर्ग पडलें ओस ॥ कांटी लागली हर्षास ॥ क्षेम कोणास देऊं आतां ॥ ८८ ॥ तुजवांचोनि हृषीकेशी ॥ गुज मी सांगूं कोणासी ॥ उठा म्हणेल भोजनासी ॥ कोण आम्हासि हरीरे ॥ ८९ ॥ आतां देवा तुजवीण ॥ कोणास करावें मार्जन ॥ शयनीं चुरित बैसूं चरण ॥ कोणाचे मी हरीरे ॥ ९० ॥ तुजवांचोनि इतर सेवा ॥ पोरटी दिसे देवाधिदेवा ॥ तरी आतां मी माधवा ॥ काय करूं सांग पां ॥ ९१ ॥ आतां मी तुजसंगें येईन ॥ म्हणोनि धरिले दृढ चरण ॥ कां निष्ठुर मजलागुन ॥ देवराया जाहलासी ॥ ९२ ॥ काय म्यां अन्याय केला ॥ म्हणून धरिसी मसीं अबोला ॥ ऐसें म्हणून मूर्छित झाला ॥ उद्धव भक्त हरीचा ॥ ९३ ॥ आतां असो या शोकासी ॥ अन्याय वाटे श्रोतयांसी ॥ आवडी पुरवील जीवासी ॥ तो एक भक्त जाणावा ॥ ९४ ॥ तंव बोले हृषीकेशी ॥ उद्धवा तूं न करीं शोकासी ॥ तूं जेव्हां भेटूं इच्छिसी ॥ तेधवां तुजपासीं मी असें ॥ ९५ ॥ मी सर्वत्र असे पाहीं ॥ रिता ठाव कोठेंच नाहीं ॥ हें रूप

एकदेशी कांहीं ॥ अविनाशी पाहीं सर्वदा ॥ ९६ ॥ तें रूप येत ना जात ॥ जन्मतें ना नाहीं मरत ॥ तें तरी असून अलिप्त ॥ नामरूप वेगळें ॥ ९७ ॥ तो नित्य असे निरंतर ॥ हस्तचरण ना विकार ॥ आदी अंत ना पार ॥ तो मी निर्धारीं जाण तूं ॥ ९८ ॥ मीच अवघें असें जाण ॥ दुजें नाहीं मजवीण ॥ ऐसें सांगोनि आत्मज्ञान ॥ उद्धवासी संबोखिला ॥ ९९ ॥ हा विस्तार भागवतीं ॥ उद्धवा सांगितला तुजप्रती ॥ आतां बद्रिकाश्रमाप्रती ॥ निघोन जावें उद्धवा ॥ १०० ॥ तुवां तेथेंचि राहून ॥ अंतरीं करावें माझें ध्यान ॥ मी निरंतर तुजलागीं जाण ॥ दर्शन देईन उद्धवा ॥ १ ॥ सवें म्हणसी जरी येईन ॥ तरी न सरलें आयुष्य प्रमाण ॥ आयुष्य मर्यादा जीवा लागुन ॥ म्यांचि नेमिली असे पैं ॥ २ ॥ ते क्रमितां असे अवकाश ॥ भेद नाहीं तुम्हा आम्हांस ॥ ऐसें बोलोनियां हृषीकेश ॥ झाला शांतविता उद्धवासी ॥ ३ ॥ मग बोले हृषीकेशी ॥ माझा देह सांडावा जळासी ॥ तो वाहात जाईल पूर्व दिशेसी ॥ ऋषि तयासी धरितील ॥ ४ ॥ तेथें मी पाषाणदेही होऊन ॥ ओढ्या जगन्नाथ होईन ॥ ऋषी करितील स्थापन ॥ पूजा घेईन सर्वांची ॥ ५ ॥ ऐसें बोलोन हृषीकेशी ॥ त्यागिता झाला देहासी ॥

ज्योति निघोन गेली कैसी ॥ तेज आकाशीं कोंदलें ॥ ६ ॥ सूर्याचा प्रकाश लोपला ॥ आकाशाचा तडक फूटला ॥ कृष्ण ज्योतिमाजी मीनला ॥ दीप जैसा समरसे ॥ ७ ॥ कर्पुर अग्नीस मिळते ठायीं ॥ नाम तयाचें नुरेचि कांहीं ॥ दीपीं दीप मिळतां होई ॥ निवाडा कैसा सांग पां ॥ ८ ॥ कीं सागरापासून झालें लवण ॥ तें सागरामार्गीं होय लीन ॥ तेथें बोलावया भेदभान ॥ सर्वथाही उरेना ॥ ९ ॥ तैसा हरिरूप हरि झाला ॥ कृष्ण निजधामासि पैं गेला ॥ मागें थोर हाहःकार जाहला ॥ द्वारकेच्या लोकांसी ॥ १० ॥ निमाली म्हणतां कृष्णमूर्ती ॥ जीवांसि वाटे लज्जा चित्तीं ॥ परी काय करावें पुढती ॥ कथा चालली पाहिजे ॥ ११ ॥ असो कृष्णाची तनु होती ॥ ते जळीं सांडिली निश्चिती ॥ ते जाऊन ओढ्या जगन्नाथीं ॥ पूजा घेत भक्तांची ॥ १२ ॥ इकडे सर्वांनीं हाहाकार केला ॥ म्हणती श्रीकृष्ण अवतार संपला ॥ तंव तो दैत्य धांविन्नला ॥ शाल्व नाम तयाचें ॥ १३ ॥ योग साधनें करून ॥ बळिरामें सोडिला प्राण ॥ इतक्यांत उद्धव गेला निघोन ॥ बद्रिकाश्रमासी तेधवां ॥ १४ ॥ मग रिता घेउनि रथ ॥ दारुक द्वारकेमाजी प्रवेशत ॥ रुक्मिणीसि कळतां वृत्तांत ॥ प्राण त्यागिला तियेनें ॥ १५ ॥

पहा त्या रुक्मिणीची भक्ती ॥ कृष्णवियोग न साहवे चित्तीं ॥ ज्योतिमाजी मिळे ज्योती ॥ तेचि गती केली तिणें ॥ १६ ॥ इतर कृष्णस्त्रिया जाण ॥ देऊं लागल्या आपुले प्राण ॥ एकीनें मंदिरास लाऊनि अग्न ॥ देह दहन पैं केलें ॥ १७ ॥ एक ती गळां लाऊन फांस ॥ सोडिती झाली प्राणास ॥ कोणी घेऊनि शस्त्रांस ॥ उदरामाजी खोविलीं ॥ १८ ॥ तैसीं सोळा सहस्र अंतःपुरें ॥ निमून गेलीं एकसरें ॥ अक्रूर वसुदेव देवकी घेऊन त्वरें ॥ उग्रसेनासहित निघाला ॥ १९ ॥ तो दैत्य येऊन अपार ॥ लुटूं लागले द्वारकापूर ॥ तें देखोनि पार्थवीर ॥ धनुष्य चढवूं लागला ॥ २० ॥ परी तें सत्व गेलें निघोन ॥ सीतें न चढे तयालागुन ॥ मग तो उगाचि पाहे अर्जुन ॥ उपाय कांहीं चालेना ॥ २१ ॥ दैत्य मिळाले अपार ॥ लुटोनि घेतलें सर्व नगर ॥ मग अग्नि लाऊन चहुंफेर ॥ द्वारका पुर दग्ध केलें ॥ २२ ॥ दैत्य गेले निघोन ॥ तें उगाच पाहे अर्जुन ॥ म्हणे हे जगन्निवास श्रीकृष्णा ॥ काय विंदान केलें हें ॥ २३ ॥ तों अग्नि पेटला बहुत ॥ सोपे माड्या भस्म होत ॥ लोकांसि वर्तला आकांत ॥ उरले ते जाती पळोनी ॥ २४ ॥ इतुकियांत समुद्रासी अनंतें ॥ सांगितलें बुडवीं यादवप्रेतें ॥

द्वारकापुर या समयातें ॥ बुजवून टाकीं आतांची ॥ २५ ॥ समुद्रें मानून ईश्वरवचन ॥ अद्भुत केलें उत्थान ॥ यादवप्रेतांसहित जाण ॥ द्वारका संपूर्ण बुडविली ॥ २६ ॥ मग तो एकला अर्जुन ॥ निघाला रथारूढ होऊन ॥ मनामाजी विचार करून ॥ पाहूं म्हणे माघारें ॥ २७ ॥ परतोनि पाहे जों पार्थ ॥ तों जल भरलें असे समस्त ॥ मग म्हणे हे अच्युत ॥ न कळे अंत तुझा पैं ॥ २८ ॥ पुढें कथा ऐका भारतीं ॥ कृष्णाचि निमाली संतती ॥ ऐसी प्रळयाची रीती ॥ पुढें होतसे अवधारा ॥ २९ ॥ यापरी सांगतां स्वर्गारोहण ॥ शंका पावलें श्रोतयांचें मन ॥ म्हणती स्वर्गा गेले पंडुनंदन ॥ कृष्णामागून कैसे ते ॥ ३० ॥ ते कथा निरोपूं तुम्हाला ॥ पार्थ हस्तनापुरा चालिला ॥ नामा विनवी श्रोतयांला ॥ पुढें कथेस चित्त दीजे ॥ ३१ ॥ इति श्रीमन्महाभारते स्वर्गारोहण कथा निरूपणन्नाम द्वितीयोऽध्यायः ॥ ३२ ॥

॥ श्रीकृष्णापणमस्तु ॥




# अध्याय - तिसरा

## ओव्या- १४७

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जय जयाजी नारायणा ॥ अनंत कोटी ब्रह्मांड जनना ॥ भक्तरक्षक दीनोद्धरणा ॥ भवभंजना नमोस्तुते ॥ १ ॥ पूर्वाध्यायी रुक्मिणीकांत ॥ स्वजनींसह पावला अंत ॥ आणि उदधिमाजी द्वारका समस्त ॥ बुडाली ऐसें पाहूनियां ॥ २ ॥ शोक संतप्त तो अर्जुन ॥ हस्तनापुरा जावया लागुन ॥ रथारूढ निघाला तूर्ण ॥ ऐसी कथा जाहली ॥ ३ ॥ जन्मेजय म्हणे वैशंपायनासी ॥ मग पुढें कथा वर्तली कैसी ॥ ती साद्यंत त्वां मजसी ॥ कृपा करून सांगिजे ॥ ४ ॥ ऐसें राजाचें ऐकून वचन ॥ ऋषि सांगे उत्तमाख्यान ॥ तेंच तुम्ही श्रोते सज्जन ॥ एकाग्रचित्त ऐकिजे ॥ ५ ॥ वैशंपायन म्हणे जन्मेजया ॥ रामकृष्णादि पावले लया ॥ तें वृत्त धर्मासि सांगावया ॥ स्वपुरीं अर्जुन निघालासे ॥ ६ ॥ करीत असतां मार्ग क्रमण ॥ श्रीकृष्णाच्या दुःखेंकरून ॥ वारंवार मूर्छित होऊन ॥ रथावरी पडतसे ॥ ७ ॥ पुनरपि सावध होऊनी ॥ हांक मारी आक्रंदोनी ॥ हे प्राण सखया चक्रपाणी ॥ भक्तरक्षका दीन बंधू ॥ ८ ॥ आजवरी आमुचें रक्षण ॥ तुवां केलेंसि बा अनुदिन ॥ क्षणोक्षणीं द्रौपदी लागुन ॥ संकटांतूनि काढिलीस ॥ ९ ॥ मजलागीं तूं द्वारकापती ॥ महासमरीं होऊनि

सारथी ॥ जय लक्ष्मीचा झेंडा जगतीं ॥ देदीप्यमान लाविलास ॥ १० ॥ ज्या ज्या काळीं आम्हां लागुन ॥ संकट प्राप्त अति दारुण ॥ तये काळीं तूं प्रत्यक्ष होउन ॥ केलेंसि रक्षण सर्वदा ॥ ११ ॥ आतां आम्ही तुजवांचोन ॥ कैसें करावें काल क्रमण ॥ ऐसें बोलतां तो अर्जुन ॥ व्याकुळ पूर्ण जाहला ॥ १२ ॥ नेत्रीं चालले अश्रुपात ॥ श्वासोश्वास दाटले बहुत ॥ हाहाकारें हृदय पिटित ॥ आक्रांत बहू करी पैं ॥ १३ ॥ पुढें जातां गांडीव पाणी ॥ विचारीतसे अंतःकरणीं ॥ कीं रामकृष्णादि वीरमणी ॥ छप्पन्न कोटी यादव येथें ॥ १४ ॥ ती द्वारका सुवर्ण खचित ॥ सर्व यादव जनांसमवेत ॥ माझिये समक्ष एक क्षणांत ॥ लयाप्रत पावली ॥ १५ ॥ जे उग्रसेनादि वृद्ध वृद्ध ॥ सर्वोपदेष्टे महाविबुध ॥ तेचि सांप्रत स्वजनासि युद्ध ॥ करोनि नष्ट जाहले ॥ १६ ॥ विनाशकाळ होताचि प्राप्त ॥ सद्‍बुद्धि तीही होय विपरित ॥ एवं बोलती जे पंडित ॥ त्याची प्रचीती आली ही ॥ १७ ॥ आणि कंस शिशुपाळ अघासुर ॥ चाणूर मुष्टिकादि दैत्य थोर ॥ ते महा प्रबळ अति क्रूर ॥ तयांचा संहार करूनियां ॥ १८ ॥ ज्याणें स्वबळें संतरक्षण ॥ केलें असे तो जनार्दन ॥ धीवराच्या एका शरें करून ॥ पावला

अ० ॥ ३ ॥ २६

मरण सांप्रत ॥ १९ ॥ तेवींच जो पृथेचा कुमर ॥ भीष्मादिकांसी करणार जर्जर ॥ तथा मजसी आज हा असुर ॥ अति दुर्धर जाहला ॥ २० ॥ तस्मात् आतां विपरीत काळ ॥ प्राप्त जाहला असे सबळ ॥ यांतूनि आम्ही कैसे सकळ ॥ पार पडूं न कळे पैं ॥ २१ ॥ आज-पर्यंत हृषीकेशी ॥ आम्हासि रक्षिता सर्वांशीं ॥ परी तो सांप्रत वैकुंठवासी ॥ जाहला निश्चयें ॥ २२ ॥ तरी आतां आमुचें रक्षण ॥ कोण करील काळापासून ॥ एवं रीति करितां चिंतन ॥ हस्तिनापुरीं पातला ॥ २३ ॥ मग तो अर्जुन किरीटमाली ॥ उतरोनियां रथाखालीं ॥ म्लान वदन मंद चालीं ॥ सभास्थळीं प्रवेशला ॥ २४ ॥ तंव तेथें चवघे जण ॥ धर्मराजादि स्वबंधु-जन ॥ श्रीकृष्णाचें करीत चिंतन ॥ बैसले असती सर्वही ॥ २५ ॥ ऐसें पाहतांचि गांडीव पाणी ॥ भाळ ठेवूनि धर्मचरणीं ॥ अधोवदन हस्त जोडुनी ॥ सन्मुख उभा राहिला ॥ २६ ॥ कोमाइलें असे वदन ॥ ओष्ठ पावती बहु स्फुरण ॥ नेत्रांमाजी बहु जीवन ॥ एकसरां दाटलें ॥ २७ ॥ ऐसी अर्जुनाची स्थिती ॥ पाहूनियां तो पृथ्वीपती ॥ चिंताक्रांत होऊनि चित्तीं ॥ अतिशयित घाबरला ॥ २८ ॥ आणि धर्म म्हणे गा अर्जुना ॥ सुखी आहे कीं यादवराणा ॥

तव नित्य सुहास्यवदना ॥ आजि म्लानता कां प्राप्त ॥ २९ ॥ कोणीं तुजसीं अपमानिलें ॥ कीं कोणें अर्जुना निर्भर्त्सिलें ॥ त्वन्मुखकमल दीन झालें ॥ किंकारण सांग बा ॥ ३० ॥ ऐसें धर्माचें ऐकूनि वचन ॥ सद्गदित झाला असे अर्जुन ॥ वदनांतूनि एक भाषण ॥ कांहीं केल्या उमटेना ॥ ३१ ॥ नेत्रीं चालल्या अश्रुधारा ॥ सर्वांगामाजी कंप थरथरा ॥ नासिकाद्वारें न निघे वारा ॥ स्तब्ध झाल्या सर्व वृत्ती ॥ ३२ ॥ ऐसें पाहूनि धर्मराज ॥ म्हणे अर्जुना काय झालें आज ॥ गंभीर चित्त तुझें सहज ॥ कोणत्या दुःखीं बुडालें ॥ ३३ ॥ ऐसी धर्मरायाची वाणी ॥ श्रवण करोनी सुभद्राजानी ॥ अंतरामाजी गहिंवरोनी ॥ आक्रंदोनी बोलतसे ॥ ३४ ॥ म्हणे जी सकळ यादवेंसीं ॥ निजधामा गेला हृषीकेशी ॥ सोळा सहस्र तत्कांतांसी ॥ आकांत थोर वर्तला ॥ ३५ ॥ शाल्व दैत्य परम उग्र ॥ लुटोनि नेली द्वारका समग्र ॥ वृद्धांसि घेऊन गेला अक्रूर ॥ प्राण सोडिला बळिरामें ॥ ३६ ॥ द्वारका बुडाली समुद्रांत ॥ कांहींच राहिलें नाही तेथ ॥ ऐसें ऐकतांचि तो कुंतीसुत ॥ धर्म मूर्च्छित पडियेला ॥ ३७ ॥ आणि भीमादि तेव्हां आक्रंदती ॥ समस्त लोक आकांत करिती ॥ नर नारींचे शोकें जगती ॥ विरूं पाहे

सर्वेही ॥ ३८ ॥ श्रीकृष्णाचा दीर्घ विरह ॥ द्रौपदीतें झाला दुःसह ॥ नेत्रीं चालले अश्रु प्रवाह ॥ कांहीं केल्या नाटोपती ॥ ३९ ॥ आणि देह झाला सर्व विवश ॥ भ्रमिस्थ झालें असे मानस ॥ म्हणे सांडूनि गेला द्वारकाधीश ॥ तुटली आस जीवाची ॥ ४० ॥ तुजवांचूनी रुक्मिणीपती ॥ कैशी होईल माझी गती ॥ ऐसें बोलतां द्रौपदी सती ॥ मूर्च्छा येऊनि पडतसे ॥ ४१ ॥ पुनः होऊनि सावधान ॥ धांव सखया ऐसें वदोन ॥ धरित्रीवरी अंग टाकून ॥ गडबडां लोळे दुःखानें ॥ ४२ ॥ वैशाखमासीं उष्णकाळीं ॥ सूर्य किरणामाजी भूमंडळीं ॥ जीवनावीण मृदु मासोळी ॥ जैसी अत्यंत चरफडे ॥ ४३ ॥ तैसे रीती पांडवनारी तेवींच सुभद्रेची झाली परी ॥ आणि कुंती माता ती करुणा स्वरीं ॥ आकांत करी अत्यंत ॥ ४४ ॥ तयांच्या शोकें करून ॥ गजबजून गेलें त्रिभुवन ॥ कृतांताचें मन दारुण ॥ परी तेंहीं झळंबळे तद्योगें ॥ ४५ ॥ द्रौपदी सुभद्रा दोघीजणी ॥ देह टाकिती तेव्हां धरणीं ॥ नानापरीचे विलाप करूनी ॥ शोक करिती आक्रोशें ॥ ४६ ॥ म्हणती देवा त्राहि त्राहीं ॥ जीवाची कैसी सांडिली सोई ॥ कृष्णा आम्हीं करावें काई ॥ तुजवांचोनि बंधुराया ॥ ४७ ॥ ग्रामवासी सकळ नारी ॥

समजाविती नानापरी ॥ म्हणती उगी राहोन क्षणभरीं ॥ सांगा सत्वरी काय झालें ॥ ४८ ॥ मग द्रौपदी बोले वचन ॥ काय मी सांगूं तुम्हां लागुन ॥ माझे अंतरामाजी तीक्ष्ण ॥ विरह भालें टोंचिती ॥ ४९ ॥ काय मी सांगूं तुम्हांपासी ॥ आजवरी जो रक्षिता आम्हांसी ॥ तो आज कृष्ण हृषीकेशी ॥ मजलागीं अंतरला ॥ ५० ॥ कौरवीं लाक्षागृह जाळिलें ॥ तेव्हां पांडवां विवरीं रक्षिलें ॥ वस्त्रहरणीं सांभाळिलें ॥ सत्व माझें जयानें ॥ ५१ ॥ अकाळीं अन्न मागावयासी ॥ क्रोधी आला दुर्वास ऋषी ॥ तें धांवोनि हृषीकेशी ॥ सत्व रक्षिता जाहला ॥ ५२ ॥ जेथें आम्हा पडती अडचणी ॥ तेथें सत्वर स्वयें येउनी ॥ जो विघ्नें वारी शारंग-पाणी ॥ तो आज टाकोनि गेला गे ॥ ५३ ॥ आतां बोलावूं कोणास ॥ कोण वारील मम संकटांस ॥ आतां माझिये मनाची आस ॥ कैसी पूर्ण होईल गे ॥ ५४ ॥ संकट देखोनि श्रीकृष्ण ॥ धांवोनि देत असे आलिंगन ॥ तयाचें पाहतांचि सुहास्य वदन ॥ वाटे समाधान जीवासी ॥ ५५ ॥ आतां बंधूची तुटली आस ॥ आतां क्षेम देऊं कोणास ॥ आज माझिये माहेरास ॥ काटी लागली सर्वस्वीं ॥ ५६ ॥ आज माझा आधार मोडला ॥ सागरामाजीं

ठेवा बुडाला ॥ सहोदर माझा अंतरला ॥ नाहिंसा झाला मजलागीं ॥ ५७ ॥ दादा गेला येथें बोलून ॥ कीं निजधामासी जाईन ॥ परी माझें कल्पीतसे मन ॥ काळांतरें होईल हें ॥ ५८ ॥ परी तेणें तांतड केली भारी ॥ मजकारणें सांडिलें दूरी ॥ आतां माझा गेला कैवारी ॥ पुनः दृष्टी पडेना ॥ ५९ ॥ ऐसें बोलूनि आक्रंदत ॥ पुनः भूमीसि आंग टाकित ॥ अति दुःखें विलाप करित ॥ कृष्ण नाम घेऊनियां ॥ ६० ॥ द्रौपदीचे करुणा वचनीं ॥ उलों पाहे सर्व मेदिनी ॥ पशु पक्षी तें दुःख पाहुनी ॥ मनीं झुरती अत्यंत ॥ ६१ ॥ मग धर्मराज होय बोलता ॥ द्रौपदी शोक न करीं आतां ॥ आम्हांसही नाहीं राहणें सर्वथा ॥ श्रीकृष्णाचिये वांचोनि पैं ॥ ६२ ॥ जी परी झाली श्रीकृष्णासी ॥ तीच परी होय आम्हांसी ॥ इत्यादि रीती बहु वचनेंसीं ॥ शांतवन करूनियां ॥ ६३ ॥ बोलावूनि बंधुवर्गासी ॥ म्हणे राज्यीं स्थापूनि परीक्षितीसी ॥ आपण जावें बद्रिकाश्रमासी ॥ कृष्णनाथें आज्ञापिलें ॥ ६४ ॥ तें धर्माचें ऐकोनी वचन ॥ पुढें गेला विदुर निघोन ॥ येथें कदा न रहावें आपण ॥ होईल विघ्न निश्चयें ॥ ६५ ॥ तो विचार मानला सकळांसी ॥ मग मूळ धाडिलें रायासी ॥ विप्रां पाचारुनियां

सभेसी ॥ सुमुहूर्तासी पाहिलें ॥ ६६ ॥ तों येऊन मांडलिक रायें ॥ अभिषेकिला परीक्षिती पाहें ॥ राज्य दिधलें धर्मरायें ॥ अभिमन्यूच्या सुतासी ॥ ६७ ॥ निशाणें रोविलीं गाजलीं रणतुरें ॥ आणि दानें दिधलीं असतीं अपारें ॥ भोजन सारूनि एकसरें ॥ वस्त्रालंकारें गौरविलें ॥ ६८ ॥ धर्मरायाची आज्ञा घेऊन ॥ मांडलिक राजे गेले निघोन ॥ परीक्षिती राव म्हणोन ॥ बोल प्रगटला महीतळीं ॥ ६९ ॥ मग धर्म म्हणे सहोदरा ॥ आतां तुम्हीं करावी त्वरा ॥ लोकांत सांगावें विचारा ॥ कीं तीर्था जातों म्हणूनी ॥ ७० ॥ त्या ऐकोनि धर्माचिया बोला ॥ पार्थ काय करिता झाला ॥ आज्ञा देई मारुतीला ॥ जावें स्वस्थळा म्हणोनी ॥ ७१ ॥ आम्ही जातों तीर्थासी ॥ तुम्हीं जावें स्वस्थानासी ॥ प्रेम दाटलें उभयतांसी ॥ उकसाबुकसी स्फुंदत ॥ ७२ ॥ हनुमंत तेव्हां निघोनि गेला ॥ आणि पार्थें रथासी नमस्कार केला ॥ मग स्वर्गासि तो जाता झाला ॥ विचार कळला देवांसी ॥ ७३ ॥ मग धर्मराज बंधूंतें म्हणत ॥ कुंती माता क्षीण बहुत ॥ तियेकारणें एक रथ ॥ घेतला पाहिजे निश्चयें ॥ ७४ ॥ वचन मानलें सर्वांसी ॥ मग सिद्ध करून महा रथासी ॥ विचारोनियां सुमुहूर्तासी ॥ सकळ जनासी

भेटले ॥ ७५ ॥ मग सांगितलें धृतराष्ट्रासी ॥ कीं आम्ही जातों तीर्थासी ॥ तुम्ही मागें परीक्षितीसी ॥ वडीलपणें सांभाळा ॥ ७६ ॥ मग धर्में सांडिलें सदन ॥ तंव तें दिसे दैन्यवान ॥ मग परीक्षिती पुढें येऊन ॥ कोल्हाळ करूं लागला ॥ ७७ ॥ म्हणे मी तुम्हांविणें ताता ॥ येथें काय करावें आतां ॥ धर्म म्हणे गुणवंता ॥ राज्यभार सांभाळी ॥ ७८ ॥ आम्ही जातों तीर्थासी ॥ तुवां चालवावें राज्यासी ॥ मग म्हणे सुभद्रेसी ॥ परीक्षितीसी सांभाळी तूं ॥ ७९ ॥ सुभद्रा बोले वचन ॥ मी समागमें येईन ॥ धर्म म्हणे तियेलागून ॥ मागें वडील कोण मुलासी ॥ ८० ॥ ऐकोन धर्माचिया बोला ॥ सुभद्रेनें आकांत केला ॥ म्हणूं लागली युधिष्ठिराला ॥ कां हो मजला त्यागितां येथें ॥ ८१ ॥ मग धर्मराज करी काय ॥ परीक्षितीसि तिचे ओटींत घालिता होय ॥ तंव तिनें मोकलोनि धाय ॥ धरिले पाय धर्माचे ॥ ८२ ॥ मग उठवोनि सुभद्रेसी ॥ धरिता झाला पोटासी ॥ नाना गोष्टी सांगूनि तिसी ॥ समजाविलें कृपेनें ॥ ८३ ॥ तों नारी नर पातले समस्त ॥ धर्म तयांसी असे सांगत ॥ आम्ही जातों तीर्थाटनार्थ ॥ मागें परीक्षितीस सांभाळा ॥ ८४ ॥ ऐकूनि सर्व नर नारी ॥ रुदन करिती नानापरी ॥ म्हणती धर्मा

अ

10

अ- ३
पृ- २०

आम्हां आभारीं ॥ घातलें तरी कोणाचे ॥ ८५ ॥ नगरवासी आक्रंदती ॥ अट्टहासें रुदन करिती ॥ धर्मा तुजवांचोनि हें निश्चिती ॥ जळो जीवित्व आमुचें ॥ ८६ ॥ कुडींतून जातांचि प्राण ॥ तियेसी येतसे दीनपण ॥ तैसें धर्मा तुजविण ॥ नगर शून्य दिसेल हें ॥ ८७ ॥ तुम्हीं जातां तीर्थासी ॥ मागें काय आज्ञा आम्हांसी ॥ आभारीं घालोनि कोणासी ॥ निरविलें असे सांग पां ॥ ८८ ॥ मग धर्मराज बोले काय ॥ तुम्हासी राजा परीक्षिती होय ॥ तो रक्षण करील निश्चय ॥ त्याची आज्ञा पाळा तुम्हीं ॥ ८९ ॥ ऐसें धर्मराज सांगोनी ॥ निघता झाला सर्वां पुसोनी ॥ तों नागरिक स्त्रिया धांवोनी ॥ लागती चरणीं धर्माच्या ॥ ९० ॥ आणि म्हणती राया त्वत्कृपेंकरून ॥ सुख पावलों बहुत दिन ॥ आतां कधीं याल परतोन ॥ ऐकोन धर्म शंकला ॥ ९१ ॥ मग द्रौपदी म्हणे तयांप्रती ॥ येथें आहेत सुभद्रा परीक्षिती ॥ तुम्ही स्वस्थ असा आपुले चित्तीं ॥ कांहीं खंती करूं नका ॥ ९२ ॥ ऐसें सर्वांसी सांगोन ॥ सातजणें निघालीं तेथोन ॥ तों नाना पक्षी श्वापद गण ॥ धर्मापुढें उभे ठेले ॥ ९३ ॥ पुढें होऊनि पक्षी बोलती ॥ म्लान वदनें करुणा भाकिती ॥ तुम्ही निघालां यात्रेप्रती ॥

आमुची गती काय आतां ॥ ९४ ॥ मग धर्म तयांसी बोलला ॥ तुम्ही व्यापार करा आपुला ॥ परि कोणीही मनुष्याला ॥ तापवूं नका सर्वथा ॥ ९५ ॥ आजवरी तुम्हांसी भय ॥ मनुष्याचें नव्हतें निःसंशय ॥ आतां विश्वासाल तरी होय ॥ प्राणघात तुमचा पैं ॥ ९६ ॥ ऐसें पक्ष्यांसी बोलतसे जाण ॥ तों श्वापदें आलीं धांवोन ॥ धर्मरायासी वंदन करून ॥ करुणा भाकिती आपुली ॥ ९७ ॥ तंव धर्म सांगे तयांसी ॥ तुम्हीं सुखीं वर्तावें वनासी ॥ परी वस्तीकारणें ग्रामासी ॥ सर्वथाही येऊं नये ॥ ९८ ॥ पूर्वीं अरण्यामाजी संचरोनी ॥ गांवांत येत सांगोठनी ॥ तैसें कराल तरी प्राणहानी ॥ होईल जाणा तुमची ॥ ९९ ॥ मग ते निघाले बैसोनि रथीं ॥ पक्षि श्वापदें रुदन करिती ॥ म्हणती आमुची विश्रांति ॥ मोडली आजपासुनी ॥ १०० ॥ पंडुपुत्र मार्गें जात ॥ घडघडा रथ चालवीत ॥ जैसीं समुद्रीं जहाजें चालत ॥ तैसे रथ शोभती ॥ १ ॥ मार्ग क्रमिला बहुत दिवस ॥ तों अंत पुरला कुंतीस ॥ प्राण झाला कासावीस ॥ जीव गेला निघोनी ॥ २ ॥ तें साहीजणें आक्रंदती ॥ वक्षस्थळें तडतडा बडविती ॥ करुणास्वरें विलाप करिती ॥ नाहीं मिती शोकातें ॥ ३ ॥ धर्मराज तेव्हां असे बोलत ॥ आज माझें

12

अध्याय - ३ पृष्ठ - २९

आटलें तीर्थ ॥ जन्म सुफळ ज्याचेनि निश्चित ॥ तें गेलें तीर्थ सुकोनी ॥ ४ ॥ आहा विधात्या काय केलें ॥ कुंतीसारखें निधान गेलें ॥ आज आमुचें उन्मळिलें ॥ कल्पतरूचें झाड पैं ॥ ५ ॥ आज माझी मोडली छाया ॥ निराधारी पडलों वायां ॥ आतां आम्ही देवराया ॥ निराधारी झालों कीं ॥ ६ ॥ आतां असो या शोकातें ॥ सद्गतीसि लाविलें कुंतीतें ॥ सारूनि सर्व क्रिया तेथें ॥ बारा दिवस राहिले ॥ ७ ॥ मातेसी सद्गतीस लाऊन ॥ मग निघते झाले तेथोन ॥ रथ घोडे ब्राह्मणासि अर्पून ॥ चरणचालीं चालिले ॥ ८ ॥ पुढें मार्ग ऐकिला कठिण ॥ म्हणून भगवीं वस्त्रें करून ॥ संन्यासदीक्षा घेऊन तत्क्षण ॥ साहीजणें चाललीं ॥ ९ ॥ यापरी होऊन विरक्त ॥ वनें उपवनें उल्लंघित ॥ तों कलिरायाचें विचारी चित्त ॥ कीं भेट घ्यावी धर्माची ॥ ११० ॥ त्याचा महा बळिया भीमसेन ॥ अकराक्षोणी मारूनि सैन्य ॥ कृष्णाप्रती बोले कीं वचन ॥ कलीसिही मारीन मी ॥ ११ ॥ तरी याचा पहावा पुरुषार्थ ॥ म्हणोनि कली विंदान करीत ॥ धर्मासि क्षुधा लावूनि बहुत ॥ विगलित करी सर्व गात्रें ॥ १२ ॥ क्षुधेनें व्यापितां धर्माचें उदर ॥ म्हणे कांहीं भक्षवा फलहार ॥ तो देखता जाहला

मनोहर ॥ आनंद वाटिका ते स्थानीं ॥ १३ ॥ तेथें दिसेना कोणी मनुष्य ॥ परी वेलास बाळकें दिसतीं विशेष ॥ धर्में सोडून पांच जणांस ॥ बाळके जाऊन तोडिलीं ॥ १४ ॥ तीं घेऊन निघाला त्वरित ॥ तों स्त्रीवेषधारी कलि धांवत ॥ महाशब्दें आरोळी करीत ॥ धर्मापाठीं लागलासे ॥ १५ ॥ मग धर्म जों मागें पाहे ॥ तों एक नारी धांवताहे ॥ पुढें पांचही जणासी लवलाहें ॥ आटोपिलें तत्क्षणीं ॥ १६ ॥ पुढें होतें एक नगर ॥ त्यांत ती धांवोनि गेली नार ॥ आकांत करोनियां थोर ॥ धांवा म्हणे लोकांसी ॥ १७ ॥ सभा बैसली होती घनदाट ॥ तेथें तिणें केला बोभाट ॥ म्हणे धांवा कोणी बळकट ॥ दृढ धरा या चोरासी ॥ १८ ॥ मग लोक पुसती झालें काय ॥ येरी म्हणे माझीं बाळें प्रिय ॥ मारिलीं आतां पाहतां काय ॥ धरा बांधा या चोरांसी ॥ १९ ॥ ऐसें ऐकितां लोक त्वरीत ॥ धर्माचा झाडा घेऊनि पहात ॥ तों पांच शिरें अकस्मात ॥ पदरीं निघालीं धर्माचे ॥ २० ॥ मग तीं शिरें धरूनि पोटासी ॥ नारी रुदन करी आक्रोशेसीं ॥ म्हणे त्राता कोणी नाहीं मजसी ॥ कैसें बाळांसी मारिलें ॥ २१ ॥ म्यां बाळकें निजविलीं वनीं ॥ तेव्हां जवळ नव्हतें कोणी ॥ मजला ताहान लागली म्हणोनी ॥

मी गेलें उदकांतें ॥ २२ ॥ तों अकस्मात या चांडाळें ॥ येवोनि मारिलीं पांचही बाळें ॥ सकुमार राजस वेल्हाळें ॥ कैसीं कापिलीं दुष्टानें ॥ २३ ॥ मजसी धांवत येतां पाहून ॥ पांचही शिरें चालला घेऊन ॥ तेथें रक्त वाहिलें संपूर्ण ॥ धडें पडलीं तिये स्थानीं ॥ २४ ॥ मजवरी असेल यांचें चित्त ॥ तरी तें मी देईन समस्त ॥ परी कैसा केला माझा घात ॥ बाळें सर्व मारिलीं हीं ॥ २५ ॥ ऐसी तियेची ऐकूनि भारती ॥ समस्त लोक काय की म्हणती ॥ धरा मारा यांसीं निश्चिती ॥ बाळ घातकी खरे हे ॥ २६ ॥ यांसि म्हणावें संन्यासी ॥ वाट पाडे हे निश्चयेंसी ॥ भुलवोनि नेती बालकांसी ॥ जीवें मारिती सत्य हें ॥ २७ ॥ यांची अनिष्ट असे वृत्ती ॥ द्रव्यावरीं बहुत प्रीती ॥ म्हणोन पांचही बाळें निश्चिती ॥ अल्पासाठीं मारिलीं ॥ २८ ॥ एक म्हणती तीरमार करा ॥ दुजे म्हणती सुळींच धरा ॥ तिजे म्हणती शिरच्छेद करा ॥ पाणी नसेल तेठायीं ॥ २९ ॥ कोणी म्हणती पुसारे यांसी ॥ कीं तुम्हीं हे परी केलीत कैसी ॥ एक म्हणती निश्चयेंसी ॥ प्रत्यक्ष प्रमाण दिसताहे ॥ ३० ॥ पुसावयाचें नाहीं कारण ॥ रुधिरें भरलें दिसे वसन ॥ आतां या घातक्यालागुन ॥ विचारितां काय तुम्ही ॥ ३१ ॥ जें

14

अध्याय ३ पृ. २२

झालें तें प्रत्यक्ष दिसतें ॥ आतां पुसोनि काय होतें ॥ ऐसें बोलतां समस्तांतें ॥ मान्य झालें तें वचन ॥ ३२ ॥ आतां या पांचांसी मारून ॥ पांचांची बायको घ्यावी हिरोन ॥ ऐसें तयांचें ऐकूनि वचन ॥ पांडव झाले भयग्रस्त ॥ ३३ ॥ धर्म तो चळचळा कांपत ॥ चौघे बंधु भयभीत होत ॥ पार्थाचें सत्व गेलें समस्त ॥ निस्तेज उभा राहिला ॥ ३४ ॥ कांहीं बोलावें जरी उत्तर ॥ तरी हे अधिकचि कोपतील समग्र ॥ म्हणोन पांडवां कांहीं विचार ॥ अल्पही न सुचे तेधवां ॥ ३५ ॥ जवळ उभा कलिराव ॥ तेथें धर्माचा न चाले उपाव ॥ मग पांच सूळ आणोनि सर्व ॥ स्कंधीं देती पांचांच्या ॥ ३६ ॥ एक म्हणती त्वरा करा ॥ या चोरांसी सुरळीं धरा ॥ तों तें ऐकोन द्रौपदी सुंदरा ॥ भयभीत जाहली ॥ ३७ ॥ वाद्यें लावोन महा गजरीं ॥ साही नेलीं गांवाबाहेरी ॥ सूळ रोविले हारोहारी ॥ जन भोंवते मिळाले ॥ ३८ ॥ तैं द्रौपदी म्हणे हे हृषीकेशी ॥ आतां मी बोलावूं कोणासी ॥ तूं गेलासि निजधामासी ॥ मागें धर्मासी गती हे ॥ ३९ ॥ मजला संकट पडे जेव्हां ॥ करीत होतें तैं तुझाधांवा ॥ आतां तुजवांचोन हे केशवा ॥ कोण सोडविल धर्मातें ॥ ४० ॥ द्रौपदीचें अंतर पोळलें ॥ तें कलीच्या चित्तीं जाणवलें ॥ मग

आपुलें रूप प्रगट केलें ॥ चरण वंदिले धर्माचे ॥ ४१ ॥ कोटि सूर्यांचा प्रकाश ॥ स्त्रीचाच झाला तो पुरुष ॥ तये काळीं पांडवांस ॥ बहु आश्चर्य वाटलें ॥ ४२ ॥ कली कलियुगींचा राजा पाहीं ॥ तो धर्मासि म्हणे सावध होईं ॥ तुज भेटावया ये समयीं ॥ धैर्य तुझें पाहिलें म्यां ॥ ४३ ॥ तरी तुम्हीं दयाळु व्हावें ॥ मज दीनासी आलिंगावें ॥ तुज म्यां छळिलें दुष्ट स्वभावें ॥ तो अन्याय क्षमिजे पैं ॥ ४४ ॥ जैसा जयाचा होय स्वभाव ॥ तैसा तो करून दावी सर्व ॥ तया सोडितां अधर्मोद्भव ॥ म्हणोनि छळिलें तुजलागीं ॥ ४५ ॥ मग भेटोनी पांडवांप्रती ॥ वंदिता झाला द्रौपदी सती ॥ आज्ञा मागोन कली निश्चिती ॥ गुप्त झाला तात्काळ ॥ ४६ ॥ मग संगें घेऊन द्रौपदीसी ॥ पांडव चालिले तीर्थासी ॥ पुढें कथा वर्तली कैसी ॥ ते सांगेल विष्णुदास नामा ॥ ४७ ॥ इति श्रीमन्महाभारते अष्टादशपर्वणि स्वर्गारोहण निरोपणं नाम तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥ ॥ छ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जय जयाजी रुक्मिणीवरा ॥ यदुभूषणा पीतांबरा ॥ पांडव सखया शारंगधरा ॥ देवकी कुमरा नमोस्तुते ॥ १ ॥ पूर्वाध्यायाचिये शेवटीं ॥ कलि पांडवांसी झाली भेटी ॥ मग तदाज्ञा घेऊनि उठाउठी ॥ कलिराव गुप्त जाहला ॥ २ ॥ आणि पुढें चालले पंडुपुत्र ॥ ऐसी कथा झाली पवित्र ॥ आतां विशेष श्रुतिपात्र ॥ उत्तमाख्यान असे पैं ॥ ३ ॥ तरी श्रोतीं सावधांतरेंसीं ॥ सादर व्हावें श्रवणासी ॥ वैशंपायन म्हणे जन्मेजयासी ॥ पुढील कथा ऐकें बा ॥ ४ ॥ पुढें जाती पंडुनंदन ॥ तंव एक लागलें महा विपिन ॥ वृक्ष भेदीत गेले गगन ॥ जाळ्या बहुत वल्लींच्या ॥ ५ ॥ कंटक वृक्ष दाटले बहुत ॥ बोरी शेंवरी खैर विदित ॥ पाय ठेवावया नसे पंथ ॥ कंटक पसरले चहूंकडे ॥ ६ ॥ फणस कदंब आम्रताल ॥ उंबर अर्जुन सादडे शाल ॥ भोंकरी पिंपळ वट तमाळ ॥ हेळे गेळे आइन ॥ ७ ॥ किंजणी मोह पळस पायरी ॥ कांचन आपटे आष्ट पिंपरी ॥ इत्यादि वृक्ष नानापरी ॥ अति निबिड चहूंकडे ॥ ८ ॥ वृक्षदाटी होऊनि बहुत ॥ खांद्यांपाशीं खांद्या अडकत ॥ परस्परांचे शेंडे मिसळत ॥ पत्रीं अभ्र न दिसेची ॥ ९ ॥ नाना वृक्षीं नाना फळें ॥ रसभरित शोभती

2

विशाळें ॥ आणि नानारंगी सुगंधिक फुलें ॥ तयांवरी शोभती ॥ १० ॥ महा वृक्षांची निबिड छाया ॥ तेथें रवि किरणा नसे वाट जाया ॥ शुक सारिका बैसोनियां ॥ मधुर शब्दें बोलती ॥ ११ ॥ लता वृक्षांच्या जाळ्यांमधूनी ॥ मृग क्रीडती आनंदेंकरूनी ॥ आणि ठायीं ठायीं वाहे पाणी ॥ निर्मळ परी थंड बहू ॥ १२ ॥ ऐसिया परी त्या वनांत ॥ सिंह शार्दूल गर्जना करित ॥ मत्त गजेंद्र किंकाटत ॥ भालुका बहुत ओरडती ॥ १३ ॥ कल्होळ करिती मयूरें ॥ आश्वलें गुरगुरती अपारें ॥ नाना जातीचीं वानरें ॥ भुभुःकारें गर्जती ॥ १४ ॥ नाना पक्ष्यांची कुळें बहुत ॥ लावे कपोत तित्तुर धांवत ॥ आणि माहेर म्हणून तेथें नाचत ॥ भूत प्रेतें सर्वदा ॥ १५ ॥ झोंटिंग ब्रह्म राक्षस अपार ॥ यक्ष गंधर्व किन्नर असुर ॥ अप्सरा आणिक नाना खेचर ॥ रात्रंदिवस संचरती ॥ १६ ॥ या परी तें घोर वन ॥ महा विस्तीर्ण अति दारुण ॥ सांगतां तयाचें थोरपण ॥ उशीर होतो कथेसी ॥ १७ ॥ ऐशिया त्या घोर विपिना ॥ एकचि मार्ग असे जाणा ॥ मध्यें घालूनि स्वकीय अंगना ॥ पांचही जण चालती ॥ १८ ॥ तों पुढें लागलें एक नगर ॥ महा विशाळ अति दुर्धर ॥ तया नाम अरण्य शहर ॥ तेथींचा नृपवर

तालकेतू ॥ १९ ॥ तो तालकेतू दैत्यनाथ ॥ महा पराक्रमी असे विख्यात ॥ षट्‌ फेर जाळ्या दाटत ॥ नगराभोंवत्या वेळूंच्या ॥ २० ॥ त्या सात दुर्गांवरी सैन्य ॥ दैत्यें ठेविलें असे रक्षण ॥ ठायीं ठायीं लंबायमान ॥ उल्हाट यंत्रें असती पैं ॥ २१ ॥ ऐशिया त्या नगरासि पाहून ॥ विचार करिती पंडुनंदन ॥ कीं अरण्यामाजी हें पत्तन ॥ कवण स्वामी याचा असे ॥ २२ ॥ ऐसा करिती ते विचार ॥ तंव तेथींचे येऊनि चौकीदार ॥ पांडवालागीं अति सत्वर ॥ अटकाविते जाहले ॥ २३ ॥ आणि म्हणतीरे तुम्हीं पांचजण ॥ कोणाची स्त्री नेतां फितावून ॥ ऐसें तयांसी बोलून ॥ दैत्याप्रती पावले ॥ २४ ॥ आणि तयासी हस्त जोडून ॥ म्हणती दैत्येंद्रा पांचजण ॥ एके सुंदर स्त्रियेसी घेऊन ॥ पळून जात आहेत पैं ॥ २५ ॥ ऐसें ऐकतांचि तालकेत ॥ वेगें आला तेथें धांवत ॥ जैसा महा काळ क्रोधयुक्त ॥ प्रळय काळीं येतसे ॥ २६ ॥ दैत्य पुसे पांचजणांसी ॥ कोठोनि आलां या ठायासी ॥ ते म्हणती आम्ही संन्यासी ॥ महा तीर्थासी जातसों ॥ २७ ॥ मग तो दैत्यनाथ बोलिला ॥ संन्यासी म्हणवितां आपणांला ॥ तरी हा स्त्री प्रपंच तुम्हांला ॥ कासया लागीं पाहिजे ॥ २८ ॥ स्त्रियेचिया दर्शनें पाहें ॥

3

4

जीवासी चांचल्य होत आहे ॥ तरी हें महत्तर विघ्न होय ॥ संन्यास धर्माकारणें ॥ २९ ॥
तुम्हीं वर्तमान सांगारे सत्य ॥ नातरी जाऊं नेदीं निश्चित ॥ ही वनिता घेऊन त्वरित ॥
वधीन तुम्हां पांचांसी ॥ ३० ॥ तुम्हीं नाहींरे संन्यासी ॥ पळवोनि आणिलें बायकोसी ॥
म्हणोनि झालेती वनवासी ॥ कोणे रायासी ठकविलें ॥ ३१ ॥ तुम्हीं क्षत्रिय ऐसे दिसतां ॥
भवदंगीं नाहीं साधुत्वता ॥ साधूंचीं लक्षणें पाहूं जातां ॥ तुमच्या अंगीं न दिसती ॥ ३२ ॥
याच मार्गानें असंख्यात ॥ ऋषि संन्यासी जाती सतत ॥ परी तुम्हां सदृश आजपर्यंत ॥
दृष्टी नाहीं देखिलें ॥ ३३ ॥ एवं ऐकोन दैत्याच्या बोला ॥ नानापरी समजाविती तयाला ॥
परी तो अधिकचि क्षोभला ॥ म्हणे न बोला कांरे सत्य तुम्ही ॥ ३४ ॥ मग दैत्य आज्ञापी
सेवकांसी ॥ दृढ बांधारे या चोरासी ॥ तंव धर्म म्हणेरे परियेसी ॥ दैत्यनाथा सांगतों
॥ ३५ ॥ हे आम्ही पांचही जण ॥ राया पंडूचे आहों नंदन ॥ जयां पांडव म्हणती सकळ
जन ॥ राजे हस्तनापुरींचे ॥ ३६ ॥ ही पतिव्रता शिरोमणी ॥ द्रुपद रायाची असे नंदिनी ॥
आम्हां पांचांची होय पत्नी ॥ तीर्थालागीं जातों आतां ॥ ३७ ॥ आम्ही राजे सोमवंशी ॥

कौरव बंधु होते आम्हासी ॥ परी राज्य न देत म्हणोन त्यांसी ॥ संग्राम केला अद्भुत ॥ ३८ ॥ युद्ध करून घोरांदर ॥ एकोत्तर शत मारिले भ्रातर ॥ त्यांहीं वेगळे गुरु पितर ॥ आमुचे हातीं निमाले ॥ ३९ ॥ अकरा अक्षौहिणी सैन्य ॥ रणामाजी मारिलें संपूर्ण ॥ तीं पातकें घडलीं म्हणून ॥ तीर्थालागीं चालिलों ॥ ४० ॥ इतका वृत्तांत सांगितला ॥ तंव तालकेतू काय बोलिला ॥ म्हणे माझिये घरासी आज आलां ॥ पर्वकाळ शोधित ॥ ४१ ॥ अरे हा दुष्ट अर्जुन पाहें ॥ मज अनायासें जोडला आहे ॥ येणें माझा पिता निश्चयें ॥ अलंबुस मारिलासे ॥ ४२ ॥ तो पितृसूड आज मी घेईन ॥ बरा हा सांपडला ऐसें म्हणून ॥ ओष्ठ दांत करकरां खाऊन ॥ शस्त्र सांवरून ऊठिला ॥ ४३ ॥ म्हणे अर्जुना शस्त्र घेईं ॥ संग्रामासी सिद्ध होईं ॥ नातरी तुम्हा पांचांसिही ॥ मारीन आतां निर्धारें ॥ ४४ ॥ मग अर्जुन म्हणे तालकेतासी ॥ तूं जरी असतास कुरुक्षेत्रासी ॥ तरी मी तुझिया पुरुषार्थासी ॥ क्षत्रधर्मासी पाहतों ॥ ४५ ॥ आतां आम्ही तापसी झालों ॥ राज्य सांडोनि तीर्थासी निघालों ॥ आतां ही गोष्ट नये बोलों ॥ संग्रामाची आम्हांसी ॥ ४६ ॥ तरी तूं ऐकें आमुची विनवणी ॥ मार्ग दावी आम्हां-

6

लागुनी ॥ दैत्यनाथा तूं जीवदान देउनी ॥ सुखी जाउंदे तीर्थांसी ॥ ४७ ॥ धर्मादि तयासी काकुळती येत ॥ म्हणती आम्हीं तूंतें शरणागत ॥ आम्हासी होऊंदे पुनीत ॥ तुझेनि पुण्यें दैत्यनाथा ॥ ४८ ॥ मग दैत्य म्हणे धर्मासी ॥ कां तूं व्यर्थ काकुळती करिसी ॥ मी संग्रामाविण तुम्हांसी ॥ जाऊं नेदी सर्वथा ॥ ४९ ॥ तों धर्मासि भीम बोलता झाला ॥ कीं युद्धाची आज्ञा द्यावी मजला ॥ येथें नावेक तालकेताला ॥ बुद्धि शिकवूं नये पैं ॥ ५० ॥ जरी द्याल आज्ञा मजलागुन ॥ तरी गदेनें मस्तक करितों चूर्ण ॥ मग एकदांचि तीर्थीं जाऊन ॥ सकळ पातकें परिहारूं ॥ ५१ ॥ धर्म म्हणे कदापि ऐसें न घडे ॥ या कर्में पातक अधिक जोडे ॥ मुहूर्तें निघालों तीर्थांकडे ॥ आतां नातुडें युद्धासी ॥ ५२ ॥ अनेक ठायीं पातक कीजे ॥ तें तीर्थक्षेत्रीं जाण निरविजे ॥ पुण्यक्षेत्रीं जो दोष कीजे ॥ तो वज्रलेप होतो पां ॥ ५३ ॥ ऐसी आहे धर्मशास्त्र नीती ॥ म्हणोन धर्म सांगे बंधूप्रती ॥ तरी बारे यावें काकुळती ॥ परी युद्ध निश्चितीं करूं नये ॥ ५४ ॥ मग पांचही जण भाकिती करुणा ॥ परी ते नये दैत्याचे मना ॥ तंव द्रौपदी म्हणे अगा हे कृष्णा ॥ दैत्य या विघ्ना उदेला ॥ ५५ ॥ तूं

गेलासि वा निजभुवना ॥ तरी मी आतां बोलावूं कवणा ॥ धांव धांवरे करुणाघना ॥ ब्रीद आपुलें सत्य करीं ॥ ५६ ॥ द्रौपदी घाबरी जाणून ॥ धांवून आला नारायण ॥ ब्राह्मणाचें रूप धरून ॥ उभा राहिला धर्मापासीं ॥ ५७ ॥ द्विज पुसे दैत्यासी ॥ हे उभे कां केलें संन्यासी ॥ दैत्य म्हणे ब्राह्मणासी ॥ संग्राम यांसी करणें आहे ॥ ५८ ॥ हे संन्यासी नव्हेत जाण ॥ हस्तनापुरींचे पंडुनंदन ॥ यांनीं माझा पिता मारिला जाण ॥ तरी सूड घेईन तयांचा ॥ ५९ ॥ मग विप्र म्हणे पांचां जणांसी ॥ कांरे न युद्ध करायासी ॥ ते म्हणती आम्ही संन्यासी ॥ आतां दैत्यासी शरण आलों ॥ ६० ॥ ऐसें ऐकूनि त्यांच्या बोला ॥ विप्र म्हणे तालकेताला ॥ हे राया तूं शरणागताला ॥ मारूं कैसें पहातोसी ॥ ६१ ॥ पूर्वीं राजा शिबि नामक ॥ त्यासि शरण झाला कपोतक ॥ म्हणोनि आपुलें मांस देख ॥ तयें दीधलें ससाण्यासी ॥ ६२ ॥ यापरी राजे पृथ्वींत ॥ आजपर्यंत झाले बहुत ॥ तुजला म्हणती हे शरणागत ॥ तरी सर्वथा अनाथ मारूं नको ॥ ६३ ॥ जेव्हां यांचें राज्य होतें ॥ तेव्हां न घेतलें सूडातें ॥ आतां अडवोनि संन्याशांतें ॥ संग्राम करा म्हणसी तूं ॥ ६४ ॥ येणें तुझी अपकीर्ती ॥ पृथ्वी

7

भरी होईल निश्चितीं ॥ म्हणतील संन्यासियांप्रती ॥ अडवून मारिलें तालकेतें ॥ ६५ ॥ हें दैत्यासी मानलें वचन ॥ म्हणे हे पांचही सोडीन ॥ परी हो या स्त्रियेलागुन ॥ न देई जाण सर्वथा ॥ ६६ ॥ तंव द्विज बोले काय ॥ हें गा प्रत्यक्ष विघ्न आहे ॥ त्या अर्जुनाचे पेखने पाहें ॥ ठाऊक असे तीं लोकीं ॥ ६७ ॥ हें तूं न विचारीं कांहीं ॥ हें आलें यश उगेंच घेई ॥ मग दैत्यनाथें सोडिलीं पाहीं ॥ साहिजणें तत्काळ ॥ ६८ ॥ मग अदृश्य झाला अनंत ॥ पांडव क्रमिती पुढील पंथ ॥ तंव अरण्ययुक्त एक पर्वत ॥ महा विस्तीर्ण देखिला ॥ ६९ ॥ बत्तीस योजनें उंच जाण ॥ आणि शाण्णव गांवें विस्तीर्ण ॥ वरी नाना वृक्ष महान ॥ पक्षि श्वापदें भयानक ॥ ७० ॥ तया देखोनि पर्वतासी ॥ आश्चर्य झालें पांडवांसीं ॥ तंव तेथें द्रौपदी सतीसी ॥ पांडव चुकले असती पां ॥ ७१ ॥ पुढें पांडव निघोनि जाती ॥ मागें राहिली द्रौपदी सती ॥ एकटी पडली घोर पर्वतीं ॥ नसे सांगाती कोणीही ॥ ७२ ॥ द्रौपदी होऊनि अति भ्रमित ॥ वनामाजी असे फिरत ॥ ऐसें देखोनि तालकेत ॥ दैत्य थोर आनंदला ॥ ७३ ॥ म्हणे आज हा कल्पित ॥ मजसी लाभ झाला प्राप्त ॥ नेणो इयेचे पांडवकांत ॥ काय झाले

असती पैं ॥ ७४ ॥ अरण्यामाजी असतां फिरत ॥ सिंहादिकीं भक्षिले निश्चित ॥ कीं क्षुधा तृषेनें होऊनि व्याप्त ॥ पावले अंत सर्वही ॥ ७५ ॥ असो आपण ही कामिनी ॥ अवचित प्राप्त झाली काननीं ॥ म्हणोन इयेसी शीघ्र घेऊनी ॥ जावें सदनीं आपुल्या ॥ ७६ ॥ ऐसा करून मनीं विचार ॥ तियेसी घेऊन गेला असुर ॥ इकडे काननीं पंडुकुमर ॥ वाट पाहती द्रौपदीची ॥ ७७ ॥ एक मुहूर्तपर्यंत जाण ॥ वाट पाहती पंडुनंदन ॥ परी न येई द्रौपदी म्हणोन ॥ विचार करिती सर्वही ॥ ७८ ॥ चरण चालीं चालतां भागली ॥ कीं वृक्ष छायेसी असे बैसली ॥ किंवा सिंहादिकीं होय भक्षिली ॥ हें कांहींच समजेना ॥ ७९ ॥ आतां करावें तरी कायी ॥ ऐसें बोलोनि लवलाहीं ॥ सर्वही बंधू ते समयीं ॥ चालिले तियेच्या शोधार्थ ॥ ८० ॥ घाबरेपणीं पंडुसुत ॥ वनामाजी तियेसि शोधित ॥ परी कोठेंचि न होय प्राप्त ॥ झाला आकांत सर्वांसी ॥ ८१ ॥ चिंता वर्तली बंधूसी ॥ तंव धर्म म्हणे कीं तयांसी ॥ बारे तुम्ही द्रौपदीसी ॥ कोठें आज विसरलेती ॥ ८२ ॥ जेव्हां संकट पडे आम्हासी ॥ तेव्हां ती बोलावीत कृष्णासी ॥ नानाविध महा विघ्नांसी ॥ समूळ नाश केला तिणें ॥ ८३ ॥ आम्ही

10

हरपिला पण ॥ तियेनें चिंतिला नारायण ॥ आपुली लाज राखोन ॥ आम्हां पांचासि सोडविलें ॥ ८४ ॥ क्षुधेनें पीडिलों वनवासी ॥ तैं स्थाली मागितली सूर्यासी ॥ सत्व ढाळावया आले ऋषी ॥ तिनें ते वेळीं आश्वासिलें ॥ ८५ ॥ किती आठवूं तियेचे गुण ॥ काय एक न बोलवे वचन ॥ सर्व निस्तारलों तियेचेन ॥ तें ऐसें रत्न हारविलें ॥ ८६ ॥ धर्म म्हणे सहदेवासी ॥ बा तूं प्रश्न पाहें द्रौपदीसी ॥ तंव तो पाहूनि ज्योतिषीं ॥ म्हणे द्रौपदी नेली तालकेतें ॥ ८७ ॥ शुद्धि लागली पांडवांसी ॥ मग धर्म म्हणे भीमासी ॥ झडकरि घेऊनि ये द्रौपदीसी ॥ न करीं घात तालकेताचा ॥ ८८ ॥ जरी मारिसी तालकेता लागुन ॥ तरी माते कुंतीची असे आण ॥ ऐसें ऐकोनि भीमसेन ॥ गदा घेवोनि धांविन्नला ॥ ८९ ॥ इकडे दैत्य म्हणे सैन्यासी ॥ अगा मी घेऊन आलों द्रौपदीसी ॥ जरी पांडव आले धांवण्यासी ॥ तरी तुम्हीं असावें सावध ॥ ९० ॥ ऐसें बोलोनियां तालकेत ॥ गेला असे स्वनगराप्रत ॥ तंव भीमसेनें येऊन धांवत ॥ हांक दीधली सिंहनादें ॥ ९१ ॥ तेणें कडाडिलें सर्व आकाश ॥ दचक पडला त्या दैत्यास ॥ पळ सूटला नगरस्थांस ॥ म्हणती विघ्न उदेलें हें ॥ ९२ ॥ सकळां

अ०

॥ ४ ।

॥ २८ ।

झाले एकमेळा ॥ तंव भीम तयां मारीत चालला ॥ तैं देखोनि दैत्यभार उठला ॥ सात अक्षौहिणी भीमावरी ॥ ९३ ॥ भीम एकला दैत्य बहुत ॥ संग्राम होतसे अति अद्भुत ॥ गदा भोवंडी कुंतीसुत ॥ अनिवार दैत्यांवरी ॥ ९४ ॥ अत्यावेशें हाणोनि गदा ॥ महावीरांचा करी चेंदा ॥ कित्येकांच्या मोडूनि पादां ॥ भूमीवरी पाडिले ॥ ९५ ॥ किती एकांचीं गदा प्रहारें ॥ कुष्मांडवत फोडिलीं शिरें ॥ एका मेदिनी एकसरें ॥ आपटूनियां मारीतसे ॥ ९६ ॥ ऐसा देखूनि भीमाचा मार ॥ रणीं दैत्या न धरवे धीर ॥ तीन अक्षौहिणी महा असुर ॥ एकेवेळीं मारिले ॥ ९७ ॥ रणकंदन झालें थोर ॥ दैत्यांचा मोडला सैन्य भार ॥ शोणिताचा चालला पूर ॥ भयंकर ते समयीं ॥ ९८ ॥ ऐसें देखोनि दैत्य पळाले ॥ एक आडामाजी पडिले ॥ जीव घेवोनि एक गेले ॥ एक रिघाले गिरि कपाटीं ॥ ९९ ॥ आकांत झाला नगरांत ॥ भीम क्रोधें असे धांवत ॥ तें देखोन तालकेतु पळत ॥ खांदीं घेऊनि द्रौपदीसी ॥ १०० ॥ तया देखोनि भीमसेन ॥ धांवे हस्तीं गदा घेऊन ॥ तंव द्रौपदीसी मार्गीं टाकून ॥ दैत्य पळाला तालकेतु ॥ १०१ ॥ धर्माची पाळिली आण ॥ म्हणोन दैत्याचा राखिला प्राण ॥ मग द्रौपदी कारणें

घेऊन ॥ आला भीम धर्मापासी ॥ १०२ ॥ जैं भेटी जाहली बंधूंसी ॥ राया काय सांगू त्या सुखासी ॥ पुढें कथा वर्तली कैसी ॥ तें सांगे नामा विष्णुदास ॥ १०३ ॥ इति श्रीमन्महाभारते स्वर्गारोहण कथा निरूपणं नाम चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥ ॥ छ ॥ छ ॥ ॥ छ ॥

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥




# अध्याय- पाचवा

## ओव्या- १२२

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जय जयाजी रुक्मिणीरमणा ॥ जय जयाजी कैवल्यनिधाना ॥ जय श्रीहरे पीतवसना ॥ तव चरणा नमो सदा ॥ १ ॥ रायासी म्हणे वैशंपायन ॥ परियेसीं राया माझें वचन ॥ द्रौपदी सांपडली देखोन ॥ कैसा पांडवां हर्ष जाहला ॥ २ ॥ धन सांपडे निर्धनासी ॥ किंवा उदक लाभे तृषार्तासी ॥ कीं मिष्टान्न मिळे रंकासी ॥ मध्यान्ह काळीं जैसें पां ॥ ३ ॥ ते विरीतीं पांडवांलागुन ॥ सुख झालें अपार जाण ॥ मग धर्मराज भीमा कारण ॥ बोले वचन सादर कीं ॥ ४ ॥ बारे द्रौपदी लाधली कैसी ॥ ही मात सांगावी आम्हांसी ॥ काय वधूनि त्या दैत्यासी ॥ द्रौपदीसी आणिलें बा ॥ ५ ॥ ऐसिया धर्माच्या बोला ॥ ऐकूनि म्हणे भीम त्याला ॥ मजसी देखतां द्रौपदीला ॥ सांडूनि पळाला तालकेतु ॥ ६ ॥ तया दुष्टा मारावयासी ॥ तुमची आज्ञा नव्हती मजसी ॥ म्हणोनि तया म्यां जीवेंसी ॥ निश्चयेंसी सोडिलें ॥ ७ ॥ परी येर संग्रामा दैत्य आले ॥ तीन अक्षौहिणी ते मारिले ॥ मग धर्म म्हणे ओखटें झालें ॥ ऐसी काय तीर्थयात्रा ॥ ८ ॥ मी भीत होतों ज्या कर्मासी ॥ तेंचि येथें घडलें आम्हांसी ॥ आतां ह्या महा पातकासी ॥ काय उपाय योजावा ॥ ९ ॥ जाहला असे जो

2

स्वकुल घात ॥ तत्पापाची शांती त्वरित ॥ व्हावयालागीं तीर्थाप्रत ॥ आम्ही समस्त चाललों ॥ १० ॥ तंव मध्येंच हें अद्भुत विघ्न ॥ आम्हां प्राप्त झालें दारुण ॥ आतां पुढें काय प्रयत्न ॥ शुद्धीलागीं करावा ॥ ११ ॥ अन्य क्षेत्रीं केलें पाप ॥ तें तीर्थीं निरसे आपेंआप ॥ आणि तीर्थीं करितां किंचित्पाप ॥ वज्रलेप होतें पैं ॥ १२ ॥ ऐसें असोनि शास्त्र वचन ॥ आमुच्या हस्तें पाप दारुण ॥ तीर्थमार्गीं झालें म्हणून ॥ काय आतां करावें ॥ १३ ॥ एवं प्रकारें युधिष्ठिर ॥ दुःख करी वारंवार ॥ तंव द्रौपदी म्हणे श्रीयदुवीर ॥ गेला टाकून आम्हांसी ॥ १४ ॥ आतां आमुचें हें व्यसन ॥ दूर करणार आहे कोण ॥ ऐसें बोलतां गहिंवरून ॥ नयनीं जीवन चाललें ॥ १५ ॥ तंव झाली आकाशवाणी ॥ कीं धर्मा तुम्हीं जावें येथुनी ॥ काशिक्षेत्रीं विश्वेश्वरा लागुनी ॥ नमन करूनि भेटावें ॥ १६ ॥ तो सांगेल तें करावें ॥ अविद्येसि हातीं न धरावें ॥ ऐसें ऐकतां पांडव भावें ॥ काशिक्षेत्रीं चालले ॥ १७ ॥ प्रयागीं झालें माधव स्नान ॥ पितरां दीधलें पिंडदान ॥ मग तेथूनियां पंडूनंदन ॥ काशियेसी चालले ॥ १८ ॥ काशिक्षेत्रामाजी जाऊन ॥ क्षौरकर्मादि संपादून ॥ मणिकर्णिकेचें स्नान करून ॥ शिवदर्शना चालिले

अ० ॥ ५ ॥ ॥ २०

॥ १९ ॥ तें कळलें विश्वेश्वरासी ॥ म्हणे पातकें घडलीं पांडवांसी ॥ दर्शन न द्यावें तयांसी ॥ म्हणोनि देव चालिला ॥ २० ॥ तंव विश्वेश्वरासी देखून ॥ धर्म म्हणे भीमालागुन ॥ भीमा पाहें पार्वतीरमण ॥ आम्हां देखून पळतसे ॥ २१ ॥ तरी तुम्हीं करावी त्वरा ॥ प्रेमें भेटावें विश्वेश्वरा ॥ विलंब होतां जगदुद्धारा ॥ निश्चयें जाणा चुकाल ॥ २२ ॥ ऐसें बोलतां युधिष्ठिर शंकर भेटी लागीं सत्वर ॥ तयामागें सहोदर ॥ महा वेगें चालले ॥ २३ ॥ तंव तो काशीसि सोडून ॥ चाललासे गयेवरून ॥ पांडवही तयामागून ॥ गयाक्षेत्रीं पावले ॥ २४ ॥ तेथें करूनि गयावर्धन ॥ पुढें शिवाचा मार्ग लक्षून ॥ महा वेगें पंडुनंदन ॥ मार्ग क्रमण करिती पैं ॥ २५ ॥ पद्मावती चालिली जैसी ॥ पांडवां त्रिस्थळीं झाली काशी ॥ पुढें पळतां पळतां श्री शिवासी ॥ श्रम झाले अपार ॥ २६ ॥ मग देव केदरासि गेला ॥ तेथें म्हैशींचा कळप देखिला ॥ तयांमाजी शंकर भोळा ॥ रूपें मिसळला म्हैशींच्या ॥ २७ ॥ आतां धर्म येईल येथें ॥ ओळखोनि घेईल श्रीशिवातें ॥ म्हणोनि अवघिया कळपातें ॥ भीमें उभा केला असे ॥ २८ ॥ मग धर्मराज तेथें आला ॥ भीमासि म्हणे शिव कोठें गेला ॥ जीं या कळपांत

पळाला ॥ तुम्हीं धरावा उमगोनी ॥ २९ ॥ तंव धर्म म्हणे सहदेवासी ॥ यांत ओळखें शंकरासी ॥ येरू म्हणे देव तो जाण त्यासी ॥ लोचन तिसरा असेल ॥ ३० ॥ हें ऐकोनियां वचन ॥ देवें केलें एक विंदान ॥ सर्व म्हैशींचीं मुखें तत्क्षण ॥ भूमीमध्यें रोंविलीं ॥ ३१ ॥ तें तयाचें पाहूनि चरित्र ॥ मग काय करी वायुकुमर ॥ पुच्छीं धरूनियां सत्वर ॥ बलात्कारें ओढूनियां ॥ ३२ ॥ मग तयांच्या मस्तकावरी ॥ तृतीय नेत्रार्थ विलोकन करी ॥ तंव त्या समस्त दोन नेत्रीं ॥ ऐशा तयें देखिल्या ॥ ३३ ॥ शेवटीं एक राहिली महिषी ॥ तोच होता देव काशिवासी ॥ भीमें धरितां पुच्छीं तयासी ॥ स्वमानसीं विचारीतसे ॥ ३४ ॥ कीं हा कुंतीचा द्वितीय सुत ॥ याचें बळ असे अद्भुत ॥ आम्ही यासीं सांपडलों अवचित ॥ आतां आम्हां न सोडी हा ॥ ३५ ॥ ऐसें चिंतूनि काय केलें ॥ पूर्व रूप शंकरें धरिलें ॥ मग अनुक्रमें तयाचीं पाउलें ॥ साहीजणीं वंदिलीं ॥ ३६ ॥ मग सांगती कीं स्ववृत्तांत ॥ आम्हांसि पापें झालीं बहुत ॥ म्हणोनि आम्ही तीर्थाप्रत ॥ साही जणें चालिलों ॥ ३७ ॥ तंव तीर्थमार्गीं तालकेतें ॥ बहु उपद्रव दिधलें आमुतें ॥ म्हणोन तेथें आमुच्या हातें ॥ पातकें बहुत झालीं पैं

अध्याय - पाचवा    पृष्ठ - 32

॥ ३८ ॥ आतां दर्शन तुमचें झालें ॥ म्हणोन पवित्र पाहिजे केलें ॥ तंव देवें तयां आश्वासिलें ॥ धर्मा झालेति पुनित ॥ ३९ ॥ अरे आमुचें जेव्हां झालें दर्शन ॥ तेव्हां तुमचें पाप गेलें पळोन ॥ आतां तुम्हीं जावें येथून ॥ हिमाचळ पर्वतासी ॥ ४० ॥ तो गिरी असे अति दुर्घट ॥ आणीक नाहीं पायवाट ॥ कृष्ण सांडूनियां वैकुंठपीठ ॥ वाट पाहतो तूमची ॥ ४१ ॥ पुण्य देही तो तेथें जाईल ॥ येर अवघे खचतील ॥ ऐसें बोलोनियां बोल ॥ शिव तत्काळ गुप्त झाला ॥ ४२ ॥ मग पंडुरायाचे नंदन ॥ धर्म भीमादि पांचही जण ॥ सवें द्रौपदीसी घेऊन ॥ झाले तेथून चालते ॥ ४३ ॥ साही जणें मार्ग क्रमिती ॥ उत्तर दिशेसि वेगें जाती ॥ तंव पुढें बद्रिकाश्रमाप्रती ॥ अवलोकिती जाहलीं ॥ ४४ ॥ ऋषिवन देखतां गहन ॥ चित्तासि झालें समाधान ॥ मनासी उन्मन ॥ सहजचि तेणें ॥ ४५ ॥ तया उत्तम ऋषिवनीं ॥ महा वृक्षांची असे दाटणी ॥ आम्र फणस किंजणी ॥ रायकेळी नानापरी ॥ ४६ ॥ पोपये डाळिंब अंजिर ॥ ऊंस नारळी पोपळी खर्जुर ॥ सफल द्राक्षीमंडप अपार ॥ खिसमिस तेथें उत्तम ॥ ४७ ॥ आणि तया बद्रिकाश्रमांत ॥ कर्दळीवृक्ष असती बहुत ॥ कर्पूर जयांच्या पोटांत ॥

5

6

अत्युत्तम होतसे ॥ ४८ ॥ तेथें मैलागिरि चंदन ॥ कुंकुम केशराचें उटण ॥ नागचांफ्यांचें उत्तम वन ॥ दाटलें असे विशाल ॥ ४९ ॥ तेथें नाना पुष्प जाती ॥ जाई जुई गुलाब शेंवती ॥ पारिजातक बहु असती ॥ आणि मंदारादि कल्पतरू ॥ ५० ॥ तेथें पक्षी असती बहुत ॥ मयूर उत्तम शब्द करित ॥ पंचम स्वरीं कोकिळा गात ॥ पारवे बहुत घुमघुमती ॥ ५१ ॥ आणि चातक राजहंस ॥ चक्रवाकसारखे बहुवस ॥ अनेक जातींच्या पक्ष्यांस ॥ वसती तेथें सर्वदा ॥ ५२ ॥ राया तेथील नवल परीयेसीं ॥ वैरभाव नाहीं कवणासीं ॥ महा प्रीतीं एकमेकांसीं ॥ नाना क्रीडा करिती पैं ॥ ५३ ॥ ऐसें तें सिद्धवन पाही ॥ सकळ ताप तेथें जाई ॥ सकळ जीवांसि विश्रांति देई ॥ ऐशा पुण्य वना देखूनियां ॥ ५४ ॥ मग साही जणें तेथें येती ॥ तंव वेदघोष ऐकूं येती ॥ मग पाहूनियां ऋषिवृंदाप्रती ॥ प्रेमें घालिती लोटांगणें ॥ ५५ ॥ मग सकळ ऋषिगण ॥ धर्मासि देती क्षेमालिंगन ॥ द्रौपदीसहित पंडु-नंदन ॥ चौघे करिती नमस्कार ॥ ५६ ॥ मग ऋषिआज्ञें ते सगळे ॥ दर्भासनीं पांडव बैसले ॥ तंव आनंदें विदुर तये वेळे ॥ प्रेमें भेटला पांडवांसी ॥ ५७ ॥ मग परस्परें वृत्तांत ॥ येरयेरांसी

केला श्रुत ॥ विदुरासि धर्म पुसे वृत्त ॥ धृतराष्ट्रगांधारीचें ॥ ५८ ॥ कीं तीं उभयतां हस्तिना-पुरीं ॥ प्राण धरूनि आजवरी ॥ राहिलीं असती कैसे परी ॥ तें न कळे स्वामिया ॥ ५९ ॥ तंव विदुर म्हणे युधिष्ठिरा ॥ तुम्ही शिवाचें सांगितलें करा ॥ आम्ही जातों हस्तिनापुरा ॥ आणावया दोघांसी ॥ ६० ॥ मग पांडव चालले उत्तरेसी ॥ विदुर निघाला दक्षिणेसी ॥ तो येऊनियां हस्तिनापुरासी ॥ गांधारि अंधांसि भेटला ॥ ६१ ॥ विदुर म्हणे अंधाप्रती ॥ तुम्ही अद्यापि कां राहिलेती ॥ देवधर्म गेले असती ॥ कलियुग प्राप्त जाहलें ॥ ६२ ॥ कृष्ण अवतार संपला ॥ धर्मराज स्वर्गासि गेला ॥ एवं ऐकोनियां बोला ॥ संतोषला अंध ॥ ६३ ॥ आणि म्हणे यथार्थ तव वचन ॥ कीं चाळविशी आह्मांलागुन ॥ विदुर म्हणे तुम्हां कारण ॥ खंती कां हो एवढी ॥ ६४ ॥ अगा आमुची वासना ऐसी ॥ जी परी झाली मत्पुत्रांसी ॥ तेचि परी पांडवांसी ॥ व्हावी मज देखतां ॥ ६५ ॥ पांडव गेले निमोन ॥ आम्ही ऐसें ऐकों वचन ॥ म्हणोनि आजवरी हे प्राण ॥ देहीं धरिले असती पैं ॥ ६६ ॥ तंव विदुर बोलिला ॥ तुमचा पण सिद्धीसि गेला ॥ तों धृतराष्ट्र संतोषला ॥ म्हणे आतां चला येथूनी ॥ ६७ ॥ मग धृत-

राष्ट्र आणि गांधारी ॥ दोघां घालूनि रथावरी ॥ विदुर चालिला झडकरी ॥ बद्रिकाश्रमासी ॥ ६८ ॥ तंव मार्गींच दोघें निमालीं ॥ बरवी सद्गती त्यांची केली ॥ मग विदुरें गुंफा टाकिली ॥ शीघ्र बद्रिकाश्रमाची ॥ ६९ ॥ इतुकें इकडे वर्तलें ॥ तिकडे पांडवीं काय केलें ॥ उत्तर दिशेचें टाकिलें ॥ महा वन दारुण ॥ ७० ॥ पांडव झडझडां चालती ॥ तंव स्वर्गाचा चावळ ऐकती ॥ स्वर्ग समीप पातला म्हणती ॥ तंव देखिला हिमाचळ ॥ ७१ ॥ तो महा भयानक थोर ॥ उंच बत्तीस योजनें विस्तार ॥ मार्ग तीक्ष्ण शस्त्रधार ॥ एकचीं दिसतसे ॥ ७२ ॥ तो दिशा रोधूनी राहिला ॥ आणिक मार्ग नाहीं जावयाला ॥ चौफेर असे कडा तुटला ॥ सप्त पाताळ खालता ॥ ७३ ॥ मग बैसले गिरितळवटीं ॥ साहीजणां चिंता वर्तली मोठी ॥ म्हणती गा देवा धूर्जटी ॥ आतां आम्हीं काय कीजे ॥ ७४ ॥ येथें दृष्टी न ठरत ॥ म्हणती न चढवे हा पर्वत ॥ ऐसें बोलतां थरथरां कांपत ॥ आली हुडहुडी पांडवांसी ॥ ७५ ॥ महा अवघड असे हा गिरि ॥ यासी मार्ग दिसे शस्त्रधारी ॥ भीम अंगें स्थूळ भारी ॥ हें कैसें विघ्न उदेलें ॥ ७६ ॥ ही द्रौपदी अंगें सकुमार ॥ कैसी चरणीं साहील धार ॥ नकुळ सहदेव

हे कुमार ॥ काय करितील बाळकें ॥ ७७ ॥ महा क्षत्रीय असे पार्थ ॥ यासि काय करिल पुरुषार्थ ॥ ऐसा धर्म चिंता करीत ॥ नाना परी जीवासी ॥ ७८ ॥ तंव द्रौपदी म्हणे धर्मासी ॥ कां जी चिंतावले जीवासी ॥ चित्तीं आठवा श्रीकृष्णासी ॥ देव सकळांसी पावेल ॥ ७९ ॥ तो शरणागतां वज्रपंजर ॥ भक्तवत्सल करुणाकर ॥ तोचि असे महा आधार ॥ निराधारियांसी ॥ ८० ॥ तोचि श्रीआदिनारायण ॥ आम्हां अंगिकारिलें मुळींहून ॥ पाहा लाक्षा जोहरींहून ॥ तेणें काढिलें तुम्हांसी ॥ ८१ ॥ वस्त्र हरणें जें जाहलें ॥ माझ्या लज्जेसी तैं राखिलें ॥ ऋषीश्वर सत्व टाळावया आले ॥ तैं राखिलें तयानें ॥ ८२ ॥ मागें अनेक झालीं व्यसनें ॥ तीं निस्तारलीं कृष्णाचेनें ॥ आतां कां तो आम्हां कारणें ॥ उपेक्षील श्रीहरी ॥ ८३ ॥ तंव धर्म म्हणे द्रौपदीला ॥ देव चित्त दे तुझिया बोला ॥ म्हणोन धांवा करीं तूं वहिला ॥ धांवणिया तुझ्या पावेल ॥ ८४ ॥ ऐसी धर्माची भारती ॥ ऐकोनियां ती द्रौपदी सती ॥ म्हणे बा कृष्णा रुक्मिणीपती ॥ धांव आतां येसमयीं ॥ ८५ ॥ झडकरी येईरे श्रीकृष्णा ॥ सुदाम्याच्या दरिद्रभंजना ॥ द्रौपदी लज्जा निवारणा ॥ धर्म रक्षणा पाव वेगीं

॥ ८६ ॥ ऐसें ऐकोनि द्रौपदीचें वचन ॥ हरी आला वैकुंठींहून ॥ पर्वत माथां उभा राहून ॥ या या ऐसें म्हणतसे ॥ ८७ ॥ तो देवाचा शब्द ऐकिला ॥ पांडवां थोर हर्ष झाला ॥ सर्वांपुढें धर्म चालला ॥ मागें येती पांचही जण ॥ ८८ ॥ पुढें चालला युधिष्ठिर ॥ तया मागून वृकोदर ॥ अर्जुनही निघाला सत्वर ॥ भीमसेना मागुती ॥ ८९ ॥ पार्थाचिया पाठीसी ॥ नकुळ चाले परियेसीं ॥ सहदेवही त्याच रीतींसीं ॥ नकुळा मागून चालला ॥ ९० ॥ सहदेवामागें त्वरें करुन ॥ द्रौपदी येत असे जाण ॥ ऐसीं तीं अनुक्रमें करून ॥ वेंघतीं झालीं गिरिवर्या ॥ ९१ ॥ मार्गी असे तो शस्त्रधार ॥ पुढें न पाहवे समोर ॥ मागें अथवा चौफेर ॥ पाहतां न ये एकमेकां ॥ ९२ ॥ मग ते म्हणती एकमेकांसी ॥ आम्हां सारथी हृषीकेशी ॥ हाचि निश्चय धरूनि मानसीं ॥ कृष्ण चिंतन करिती पैं ॥ ९३ ॥ साही जणें चढती पर्वत ॥ शस्त्रधार खंड जंव ओलांडित ॥ तंव तेथें जाहलें अद्भुत ॥ देह गळे द्रौपदीचा ॥ ९४ ॥ सहदेव म्हणे गळली द्रौपदी सती ॥ मग पांडव थोर आक्रंदती ॥ अहा रत्न गेलें म्हणती ॥ आजि आमुचें हातींचें ॥ ९५ ॥ इयेच्या आधारें करून ॥ थोर निस्तरलों आम्ही व्यसन ॥ वनीं बारा वर्षें अन्न ॥ इणें आम्हां पुरविलें

॥ ९६ ॥ जिचा होता देव सारथी ॥ त्या द्रौपदीस झाली ही गती ॥ येरां अंतरीं थोर भीती ॥ म्हणती केवीं विघ्न निस्तारूं ॥ ९७ ॥ मग पुढें चालिले आक्रंदत ॥ हिमाचळा वेंघती समस्त ॥ तंव नकुळ अर्जुना सांगत ॥ सहदेव खचला म्हणोनी ॥ ९८ ॥ मग चौघे दुःखित होऊनी ॥ म्हणती जेथें आम्हां पडे अडचणी ॥ तेव्हां प्रश्न पुसतां त्यालागुनी ॥ संकटा पासुनी सोडवी तो ॥ ९९ ॥ ऐसें बोलोनियां वचन ॥ बंधू चालिले चौघेजण ॥ तंव भीमासि सांगे अर्जुन ॥ जाण खचला जी ॥ १०० ॥ ऐकोनि वचन पार्थाचें ॥ मोहें मन कळवळलें धर्माचें ॥ म्हणे अहा निधान आमुचें ॥ हारपलें आजि येथें ॥ १ ॥ तिघे बंधु रुदन करिती ॥ म्हणे कां जी विसरला श्रीपती ॥ ऐसीं हीं रत्नें येथें पडती ॥ आमुच्या हातचीं गळोनी ॥ २ ॥ धर्म बोले गहिंवरें करून ॥ म्हणे संग्रामा जातसों दोघे जण ॥ तैं बा माझा अखंड जाण ॥ उभा असे मजपाशीं ॥ ३ ॥ त्या दुःखें असे श्रमला ॥ म्हणोनि न पुसतां आजि गेला ॥ ऐसें बोलें तंव भीम बोलिला ॥ जी वीर खचला अर्जुन ॥ ४ ॥ तें ऐकोनि भीमाचें वचन ॥ दुःखें उलथों पाहे धर्माचें मन ॥ म्हणे अहा देवा मंडण ॥ आजि गेलें आमुचें ॥ ५ ॥ जेणें बाणीं

12

सेतु बांधिला ॥ हनुमंतासीं पै जें जिंकिला ॥ ऐरावत उतरिला ॥ मातेचिया बोलासी ॥ ६ ॥ स्वर्गींचा जिंकिला इंद्र ॥ आणि पाताळींचा भोगींद्र ॥ मृत्युलोकींचें नृपवर ॥ जिंकिलें एके अश्वमेधीं ॥ ७ ॥ जेणें त्रैलोक्य जिंकिलें पाहीं ॥ ऐसा बळी आणीक नाहीं ॥ ऐसें दुःख करी तों पाहीं ॥ वीर खचला भीमसेन ॥ ८ ॥ तें कळोनि युधिष्ठिर ॥ दुःखें आकांत करी थोर ॥ भीमासारखा सहोदर ॥ आतां केवीं पाविजे ॥ ९ ॥ आज माझा आधार मोडला ॥ धैर्य पर्वत माझा खचला ॥ आतां मी पडलों एकला ॥ भीमा करूं काय तुजविणें ॥ ११० ॥ तिघे बंधू गेले निमोनी ॥ परी पाठीसि तूं होतास म्हणोनी ॥ त्वदाधारें धैर्य मीं मनीं ॥ धरिलें होतें भीमसेना ॥ ११ ॥ परी आजि पाठी पडली ओस ॥ बा आतां माझी तुटली आस ॥ दिशा दिसती ह्या उदास ॥ भीमसेना तुजवीण ॥ १२ ॥ बारे मी आतां काय करूं ॥ न साहवे हा दुःख भारू ॥ भीमा तूं सहोदरू ॥ कैसा टाकोनि गेलासी ॥ १३ ॥ एवं प्रकारें युधिष्ठिर ॥ बंधूंचें दुःख करीत अपार ॥ मार्गींच हिमपर्वतावर ॥ एकला स्थिर राहूनियां ॥ १४ ॥ वर्णी भीमाच्या प्रतापासी ॥ म्हणे आतुरबळ भीमासी ॥ गदेनें हाणोनि दुर्यो-

धनासी ॥ एकचि घायें पुरा केला ॥ १५ ॥ दुर्योधनाच्या मोक्ष दिवशीं ॥ तुंबळ युद्ध झालें भीमासी ॥ वरी येतां महा हस्तीसी ॥ वीरें भीमें काय केलें ॥ १६ ॥ वरील हस्ती पडों पाहे ॥ तंव भीमें गज हाणिला आहे ॥ ते अद्यापि वायु चक्रीं पाहें ॥ कलेवरें दोन्ही फिरताती ॥ १७ ॥ ही आदिपर्वींची कथा ॥ व्यास कथूनि गेला होता ॥ परी तेव्हां जन्मेजयाच्या चित्ता ॥ अस्वस्थता पडियेली ॥ १८ ॥ धर्मासि शोक करितां ॥ आणि भीमाचा प्रताप वर्णितां ॥ जन्मेजयाच्या तत्काल चित्ता ॥ शंका असे पडियेली ॥ १९ ॥ धर्म भीमाचें दुःख करी थोर ॥ म्हणे आतां ऐसा कैंचा सहोदर ॥ पांच लक्ष वायुचक्र ॥ तेथें फिरती कलेवरें ॥ १२० ॥ ऐशी ओंवी वाचितां ऋषी ॥ असत्य वाटलें जन्मेजयासी ॥ म्हणे ही अघहित कैसी ॥ मात सांगितली ऋषीनें ॥ १२१ ॥ ऐसें रायें कल्पिलें ॥ दोषासि मूळ असे उरलें ॥ पुढें काय वर्तलें ॥ तें सांगे नामा विष्णुदास ॥ १२२ ॥ इति श्रीमन्महाभारते स्वर्गारोहणपर्व कथा पंचमोऽध्यायः ॥ ५ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥




# अध्याय- सहावा

## ओव्या:- ७८

अध्याय :- सहावा पृष्ठ - ३८

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जय जयाजी पुरुषोत्तमा ॥ जय जयाजी वैकुंठधामा ॥ जय श्रीहरे शिव विश्रामा ॥ आत्मारामा नमोस्तुते ॥ १ ॥ वैशंपायन म्हणे जन्मेजयास ॥ पुढील कथा ऐकें सावकाश ॥ कलेवरें तीं एकमेकांस ॥ गुंतलीं असती वायुचक्रीं ॥ २ ॥ म्हणोनि तया वायुचक्रांत ॥ दोन्ही अद्यापि असती फिरत ॥ ऐसें ऋषी असे सांगत ॥ परी असत्य वाटे जन्मेजया ॥ ३ ॥ तेथें कैसे परी जाहलें ॥ मागें पार्थें युद्ध उदंड केलें ॥ परी कुरुक्षेत्रीं वचन मोडिलें ॥ तें विदान कृष्णाचें ॥ ४ ॥ देवाची वासना ऐसी ॥ जें झालें सांगावें पार्थासी ॥ म्हणोनि मोह उपजविला त्यासी ॥ गीता मुखेंसी सांगावया ॥ ५ ॥ येथें तेचि परी जाण ॥ नित्य पर्वीं उठे ब्राह्मण ॥ येवढी पर्वणी रायें ऐकून ॥ असत्य काय मानावें ॥ ६ ॥ ऋषि सांगे स्वर्गारोहण ॥ परी विश्वासत नाहीं रायाचें मन ॥ कथा होता संपूर्ण ॥ नुठेचि ब्राह्मण अठरावा ॥ ७ ॥ तैसेंचि कापड शुद्ध न होत ॥ तें राजा थोर गजबजला तेथ ॥ आणि चिंती कीं कां मजप्रत ॥ येवढी प्रचीत न आली ॥ ८ ॥ मग रायें ऋषीस केली विनवणी ॥ कथा संपूर्ण सांगितली स्वामीनीं ॥ परी प्रचीत मजलागुनी ॥ नयेचि ताता एवढी ॥ ९ ॥ जी

2

तुमचे कृपेंकरून ॥ सतरा उठले मृत ब्राह्मण ॥ आणि तेवींच कापड संपूर्ण ॥ सतरा हात शुद्ध झालें ॥ १० ॥ आणि हें स्वर्गारोहण सांगतां ॥ कापडा नव्हेचि शुद्धता ॥ आणि मृत ब्राह्मणासी सजीवता ॥ अठराव्यास नव्हे कां ॥ ११ ॥ तंव तो ऋषी असे म्हणत ॥ राया काय तुवां मानिलें असत्य ॥ वचन सांगे यथार्थ ॥ नाहीं तरी शाप देईन ॥ १२ ॥ ऋषी सकोप ऐसा बोलिला ॥ ऐसें पाहूनि राजा भ्याला ॥ आणि म्हणे जी असत्य जीवाला ॥ वाटलें एक स्वामियां ॥ १३ ॥ जी वायुचक्राचें गणित ॥ पांच लक्ष योजनें ऐसें सांगत ॥ त्यांत कलेवरें अद्यापि फिरत ॥ हें मला असत्य वाटलें ॥ १४ ॥ मग वायु चक्रीं दर्भ टाकुनी ॥ ऋषीनें कलेवरें पाडिलीं धरणीं ॥ तया गजबजें करूनी ॥ दिशा सर्व दाटल्या ॥ १५ ॥ मग ऋषी म्हणे रायासी ॥ दृष्टीनें पाहें कलेवरांसी ॥ मग सोडोनि आसनासी ॥ राजा पाहों चालिला ॥ १६ ॥ तंव पर्वता एवढीं दोनी ॥ गजांचीं कलेवरें देखुनी ॥ जन्मेजय राजा विस्मित मनीं ॥ म्हणे बळी होते पूर्वज ॥ १७ ॥ विकल्प अंतरींचा गेला ॥ राजा पुनरपि आसनीं बैसला ॥ मग अठरावा हात शुद्ध झाला ॥ आणि उठिला ब्राह्मण ॥ १८ ॥

अ० ॥ ६ ॥ ३७

मग राव म्हणे ऋषीसी ॥ माझ्या फेडिलें संदेहासी ॥ अवघें शुद्ध केलें कापडासी ॥ अठरा ब्राह्मण उठलें ॥ १९ ॥ जी थोर सामर्थ्य कथेसी ॥ प्रचीत आली माझ्या मनासी ॥ मग पुसोनियां राजयासी ॥ वैशंपायन निघाले ॥ २० ॥ तंव तया ऋषीचे पाय ॥ जन्मेजय धरिता होय ॥ जी उत्तीर्ण उपकार काय ॥ मज केलें दोषावेगळें ॥ २१ ॥ मीं पूर्वजांची निंदा केली ॥ त्या पातकें काया लोपली ॥ ते स्वामीनीं व्यथा हरिली ॥ ब्राह्मण असत्यापासुनी ॥ २२ ॥ परी विनंती माझी ताता ॥ ती परियेसा जी आतां ॥ धर्म स्वर्ग धारें चालतां ॥ मन दुःखित तयाचें ॥ २३ ॥ कथा सांगितली तेथून ॥ परी माझें नव्हतें तेथें मन ॥ लटिकाचि भ्रम धरून ॥ असत्य चक्रीं पडलों होतों ॥ २४ ॥ जेविं राहु चंद्रकळा ग्रासी ॥ अथवा अभ्र लोपवी दिनकरासी ॥ तैसें असत्यें माझिया मनासी ॥ कवळिलें होतें पैं ॥ २५ ॥ जेवीं मीन असे उदकांत ॥ परी पार नसे त्याचा कळत ॥ तैसेंचि माझें हें चित्त ॥ असत्यीं खेळत होतें पां ॥ २६ ॥ परि ते माझी चित्त भ्रांती ॥ स्वामिनीं केली असे परौती ॥ प्रत्यक्ष पाडोनियां हत्ती ॥ दोन्ही कलेवरें दाखविलीं ॥ २७ ॥ जेथूनि मूळ संदेहासी ॥ परी आवडी

3

4

राहिली मम मानसीं ॥ तेचि कथा पुनरपि मजसी ॥ सांगिजे ऋषे साद्यंत ॥ २८ ॥ ऐसें बोलोनि जन्मेजय ॥ पुनरपि धरी ऋषीचे पाय ॥ मग तो वैशंपायन ऋषिवर्य ॥ बोलता होय तयासी ॥ २९ ॥ अगा तो राजा युधिष्ठिर ॥ बंधूंचें दुःख करीत थोर ॥ म्हणे मी ऐसे सहोदर ॥ आतां कधीं देखेन ॥ ३० ॥ महा प्रतापी बंधु सरले ॥ द्रौपदी सारखें रत्न गेलें ॥ आणि श्रीकृष्णानें आम्हां सांडिलें ॥ म्हणोनि पिटिलें वक्षस्थळ ॥ ३१ ॥ आणि गिरि वोलंघत ॥ नाना शोक असे करीत ॥ आपआपणापाशींच तेथ ॥ दुजा कोणीच नाहीं पैं ॥ ३२ ॥ धर्म शोक करित चालला ॥ मग समजावी आपुल्या मनाला ॥ म्हणे रहाणें आहे कवणाला ॥ ही मृत्युलोकींची वसती ॥ ३३ ॥ सर्वही गेलें चक्रवर्ती ॥ अवतारासारिखे नेणों किती ॥ मग इतर मानवांची गती ॥ काय येथें वर्णावी ॥ ३४ ॥ मृत्युलोकींचा व्यापार ॥ मरण असे साचार ॥ रावण गेला निशाचार ॥ चौदा चौकडी राज्य जयाचें ॥ ३५ ॥ नव्याण्णव सहस्र वरुषांचें ॥ आयुष्य होतें दशरथाचें ॥ सरतां प्रमाण आयुष्याचें ॥ तोही गेला मरोनियां ॥ ३६ ॥ एक अर्बुद साठ कोटी पहा ॥ नवलक्ष आणि सहस्र दहा ॥ सात

शतें तीन मास पहा ॥ आयुष्य हिरण्यकश्यपास ॥ ३७ ॥ त्याचें सरतांचि आयुष्य ॥ मृत्यु आला असे तयास ॥ राहणें नाहींच कवणास ॥ मृत्युलोका माझारी ॥ ३८ ॥ चौदा कल्पी मार्कंडेय पडे ॥ तैं रोमहर्षणाचें रोम झडे ॥ त्याचे अंतीं निमिष मोडे ॥ बकदालभ्य ऋषीचें ॥ ३९ ॥ निमिष बकदालभ्यास ॥ तैं वडहंसाचें जाय पिस ॥ अंत पुरतां ऐसियास ॥ एक श्वास भृचंडीचा ॥ ४० ॥ भृचंडीचा होय जैं अंत ॥ तैं तो कूर्माचा दिवस म्हणत ॥ ऐसे तेही असती जात ॥ न राहे कोणी मृत्युलोकीं ॥ ४१ ॥ ऐसी येथींची उत्पती ॥ ब्रह्मा विष्णु रुद्र न राहती ॥ काळांतरें तेही सरती ॥ आकारलीं पंच भूतें ॥ ४२ ॥ जेथें राहणें नाहीं ऐसियांसी ॥ तेथें कोण पाड या जीवासी ॥ ऐसें नाना परी मानसीं ॥ धर्म असे विचारित ॥ ४३ ॥ ऐसी कथा अति अद्भुता ॥ रायासि ऋषी झाला सांगता ॥ मग तो आश्चर्य मानूनि चित्ता ॥ झाला बोलता तयासी ॥ ४४ ॥ जी ऋषिवर्या ताता ॥ तुम्हीं आयुष्याचे सांगितलें गणिता ॥ परी येथें माझिया चित्ता ॥ शंका असे उपजली ॥ ४५ ॥ जरी म्यां भयानें न पुसावें तुम्हासी ॥ तरी निवृत्ति नव्हे संदेहासी ॥ तंव तो म्हणे न भीतां मजसी ॥ सुचवीं

6

अर्थ जीवींचे ॥ ४६ ॥ जी म्यां नेणतपणें एक पुसिलें ॥ तें तुम्हीं साच करोनि दाखविलें ॥ हस्तीचें कलेवर पाडिलें ॥ प्रत्यक्ष तुम्हीं स्वामिया ॥ ४७ ॥ मग ऋषी म्हणे रायास ॥ राया संदेह वाटती जे जीवास ॥ तेचि समग्र सावकाश ॥ मजलागीं विचारीं तूं ॥ ४८ ॥ मग जन्मेजय म्हणे ऋषिवर्या ॥ जें तुम्हीं चौदा चौकडिया ॥ राज्य सांगितलें स्वामिया ॥ तया रावणाचें ॥ ४९ ॥ तरी एक चौकडीसी ॥ काय गणित असे ऋषी ॥ आणिक दूसरी सेवेसी ॥ विनंती असे स्वामिराया ॥ ५० ॥ जी त्या मार्कंडेया लागुन ॥ चौदा कल्प आयुष्य प्रमाण ॥ ऐसें कथिलें असे आपण ॥ आणि अन्याचें अमर्याद ॥ ५१ ॥ तरी जयाचें आयुष्य अपरि- मित ॥ महा कल्पाहूनि निवाड दिसत ॥ परी महा कल्पांतीं होय समस्त ॥ प्रळय पंच भूताचा ॥ ५२ ॥ तरी महा कल्पाचे अंतीं ॥ ते ऋषि कैसे राहती ॥ हेचि माझी समस्त भ्रांती ॥ फेडावी त्वां स्वामिया ॥ ५३ ॥ मग म्हणे वैशंपायन ॥ परियेसीं गा राया वचन ॥ प्रसंगीं त्वां उत्तम प्रश्न ॥ केलासि बा मजलागीं ॥ ५४ ॥ कृत त्रेता द्वापार कलियुग जाण ॥ ही एक चौकडी चारी मिळोन ॥ ऐशा चौदा होता संपूर्ण ॥ राज्य झालें रावणाचें ॥ ५५ ॥

आतां दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर ॥ राया सांगतों ऐकें सविस्तर ॥ महा कल्पांत जाण साचार ॥ न राहणें वा कवणासी ॥ ५६ ॥ अगा महा कल्पांताच्या अंतीं ॥ चराचर प्रळयो म्हणती ॥ तंव हे ऋषि तत्व सिद्ध होती ॥ ऐसें आहे जन्मेजया ॥ ५७ ॥ अगामीं मागें तुजलागुनी ॥ कथिली थोडी सृष्टीची उभवणी ॥ आतां आनंदमय करूनी ॥ ऐकें सृष्टि रचना विस्तार ॥ ॥ ५८ ॥ जें जयापासून उत्पन्न होतें ॥ तें तयासी निःपात होतें ॥ आप मुसळधारा वर्षतें ॥ तेव्हां जळमय पृथ्वी ही ॥ ५९ ॥ पृथ्वी जाय नासोन ॥ मग जळमय हें संपूर्ण ॥ तैं ते जळमय होऊन ॥ असती जाण सर्व ऋषी ॥ ६० ॥ ऐसे ते ऋषी सकळ ॥ जळीं असतां कांहीं काळ ॥ मग तेजाचा महा कल्लोळ ॥ अकस्मात उठे तेथें ॥ ६१ ॥ तें तेज शोखी जळासी ॥ तंव तें तेजासारिखे परियेसीं ॥ नाश होय उदकासी ॥ तेज कल्लोळीं अमीच्या ॥ ६२ ॥ पुढें तेजाचें सरतां संचित ॥ महा वेग सुटे मारुत ॥ तयाच्या योगें तेज समस्त ॥ लोपोनियां जातसे ॥ ६३ ॥ निमतां सर्व हुताशन ॥ अवघा वातचि होय पूर्ण ॥ तैं ते समस्त ऋषी जाण ॥ पवनासारिखे होती पैं ॥ ६४ ॥ कांहीं काळें पवना लागून ॥

ग्रस्त करीं पैं गगन ॥ मग त्या समस्त ऋषीं कारण ॥ होणें प्राप्त गगन रूप ॥ ६५ ॥ नासोनि जातां सर्व पवन ॥ अवघेंचि जाण गगन ॥ मग कांहीं काळ लोटून ॥ ॐकार ग्रासी गगनातें ॥ ६६ ॥ ॐकार सर्वत्र होतां विस्तृत ॥ आकाशाचा होय निःपात ॥ तये काळीं ऋषी समस्त ॥ होती जाण तमोरूपी ॥ ६७ ॥ निःपात होतां आकाशास ॥ तमचि होय कांहीं दिवस ॥ मग रजोगुण तत्काल नाश ॥ करित सर्व तमाचा ॥ ६८ ॥ तम जातां सर्व नासून ॥ मग अवघाचि होय रजो गुण ॥ तंव ते ऋषी संपूर्ण ॥ होती रजासारिखे ॥ ६९ ॥ मग कांहीं काळपर्यंत ॥ रजचि अवघें असे सतत ॥ सरतां तयाचें संचित ॥ सत्व ग्रासी रजाला ॥ ७० ॥ राया तंव ते सर्व ऋषी ॥ सत्वासारिखे परियेसीं ॥ मग सत्व तें वस्तूसी ॥ मिळोनियां जातसे ॥ ७१ ॥ राया तंव ते सर्व ऋषी ॥ मिळोन जाती वस्तूसी ॥ ऐसे सरले परियेसी ॥ वस्तुत्वातें ॥ ७२ ॥ तरी पृथ्वी आप तेज वायु गगन ॥ आणि सत्व रज तमो गुण ॥ हे पूर्ण काळें करून ॥ नासोनी जाती ॥ ७३ ॥ होतां एकमेकांचा नाश ॥ किती काळ जाती बहुवस ॥ वस्तु तेंचि अविनाश ॥ नित्य स्वरूप जाण ॥ ७४ ॥ वस्तु नित्य असे

मतत ॥ एकचि तें नाहीं नासत ॥ येर अवघें मिथ्या भूत ॥ नासोनि जाय आकारलें ॥ ७५ ॥ गाया असो या उपरी जाण ॥ होय सृष्टीचें निवारण ॥ संहार उत्पत्ति आणि पालन ॥ या परी नृपनाथा ॥ ७६ ॥ एवं ऋषीचिया बोला ॥ ऐकोनि राव थोर संतोषला ॥ मग म्हणे जी फेडिला ॥ संदेहो स्वामिया ॥ ७७ ॥ आतां कथा सांगिजे पुढती ॥ म्हणोनि रायें केली विनंती ॥ तेघि कथा श्रोतयां प्रती ॥ सांगेल नामा विष्णुदास ॥ ७८ ॥ इति श्रीमन्महाभारते स्वर्गारोहण पर्व कथा षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ छ ॥




# अध्याय- ७ वा

# ओव्या- ९५

अध्याय - ७ वा पृष्ठ-४२

श्रीगणेशाय नमः ॥ ॥ जय जयाजी वैकुंठधामा ॥ जय जयाजी आत्मारामा ॥ योगिजन मनविश्रामा ॥ परब्रह्मा नमोस्तुते ॥ १ ॥ वैशंपायन म्हणे जन्मेजयास ॥ राया पुढील कथा परियेस ॥ जेणें सत्वरी होय नाश ॥ महा पातकांचा ॥ २ ॥ जी कथा पुण्यपावनी ॥ त्रैलोक्य तापत्रय हारिणी ॥ सर्व दोष निवारणी ॥ मुक्तिदाइनी सर्वदा ॥ ३ ॥ ते हे तुझ्या पूर्वजांची कथा ॥ श्रवण करीं परीक्षितिसुता ॥ श्रवण मात्रें दोषां समस्तां ॥ नाश तत्वता होतसे ॥ ४ ॥ मग तो राजा युधिष्ठिर ॥ बंधूंचें दुःख करीत थोर ॥ त्या हिमाचलाचें पाठार ॥ हळू हळू चढतसे ॥ ५ ॥ दुःख करितां धर्मासी ॥ संबोखी आपआपणासी ॥ परी धर्माचिया मानसीं ॥ कल्लोळ उसळती मोहाचे ॥ ६ ॥ त्या धर्माचें अंतर्गत ॥ सुकुमार असे बहुत ॥ म्हणोनि मायेच्या येत ॥ लहरी तयासी ॥ ७ ॥ जेविं भरतें भरे सागरीं ॥ लहरीमार्गे येत लहरी ॥ तैसे धर्माचे अंतरीं ॥ मोह तरंग उचंबळत ॥ ८ ॥ आतां मी करूं काये ॥ हें महा दुःख मनीं न साहे ॥ अद्यापि कां राहिला आहे ॥ देहीं प्राण माझिया ॥ ९ ॥ जरी करूं आत्मघात ॥ तरी वैकुंठी ठाव नेदी अनंत ॥ तंव धर्माचा अंगुष्ठ कापत ॥ झाला वाम चरणाचा

2

॥ १० ॥ धर्म जंव अंगुष्ठ पाहे ॥ तंव तो गळोनि पडिला आहे ॥ देहीं प्राण मात्र माझिये ॥ उरला असे काय करूं ॥ ११ ॥ आपुल्या दुःखें घाबरा झाला ॥ दुःख पांचांचें तो विसरला ॥ मग गिरिमाथ जंव पावला ॥ तंव ज्ञान उदेलें ॥ १२ ॥ कीं म्यां पाप केलें कोण ॥ अंगुष्ठ कां गेलें गळोन ॥ द्रौपदी म्हणे जें महा विघ्न ॥ उदेलें होतें आम्हांसी ॥ १३ ॥ तिचा अभिलाष मुळींहुनी ॥ करीतसे दुर्योधन मनीं ॥ नाना कपटें करोनी ॥ आम्हां वैरी झाला तो ॥ १४ ॥ मग तियेच्या अभिमानें करूनी ॥ अहंता धरिली चौघांनीं ॥ बंधु कौरव सर्व मारुनी ॥ राज्य घेतलें बळेंची ॥ १५ ॥ त्या पापास्तव पाहें ॥ त्यांचे असती खचले देह ॥ मज ही पातकें पाहें ॥ घडलीं त्यांचेनीं ॥ १६ ॥ माझे म्हणोनि मोह धरिला ॥ नर कीं कुंजर बोलिलों बोला ॥ म्हणोनि हा झडला ॥ अंगुष्ठ माझा ॥ १७ ॥ त्राहि त्राहि श्रीमुरारी ॥ येवढा पडिलों लटकियांचे भरीं ॥ तीं माझीं होत सोयरीं ॥ म्हणोनि मोहें गुंडाळिलों ॥ १८ ॥ परी तीं माझीं जरी असतीं ॥ तरी मज सांडोनि कां जातीं ॥ कोणी कोणाची नव्हेतीं ॥ लटकी भ्रांती पडली देवा ॥ १९ ॥ ऐसा जीवासी प्रबोध करूनी ॥ मग धर्म चालिला तेथोनी

कृष्णचरण हृदयीं धरोनी ॥ पंथ क्रमीं हळू हळू ॥ २० ॥ तंव द्वादश योजनें पाहे ॥ नदी इंगळांची आहे ॥ ज्वाळारूपी जल वाहे ॥ अति प्रदीप्त भडभडा ॥ २१ ॥ हा रुद्राचा होय तृतीय नयन ॥ ऐसें धर्म करी चिंतन ॥ शमन नव्हे हें दारुण ॥ काय आतां करावें ॥ २२ ॥ तेज दृष्टीस न समाये ॥ पैलथडी मेरु दिसताहे ॥ भोंवताला अंधःकार पाहे ॥ विचार न दिसे उल्लंघना ॥ २३ ॥ तो सांगतो आकार ॥ महा भयानक दिसतो थोर ॥ मग तो युधिष्ठिर ॥ क्रमी पाठार गिरीचा ॥ २४ ॥ तंव देव विचार करीत ॥ म्हणती धर्मासी दुःख झालें बहुत ॥ दुःखाचे अंतीं धरील सत्व ॥ कीं सांडील आतां ॥ २५ ॥ म्हणोनी मायेचें श्वान ॥ इंद्र झाला आपण ॥ माया दावी तया लागून ॥ अत्यंत तळमळी ॥ २६ ॥ श्वानाशी किर्ण असे देहीं ॥ गोमाशांची भणभण पाहीं ॥ लस दुर्गंधी घाण देहीं ॥ आंतडीं पडती तुटोनियां ॥ २७ ॥ ते भुलले माथाचिया घाई ॥ दुःख न साहे एके ठायीं ॥ उठे बैसे ठायीं ठायीं ॥ लोळण घाली जेथें तेथें ॥ २८ ॥ धर्में देखिलें त्या श्वानासी ॥ थोर कृपा उपजली तयासी ॥ म्हणे मज सारिखेंचि यासी ॥ दुःख झालें करील काय ॥ २९ ॥ मग जवळी जाऊन ॥ कृपेनें धरिलें

4

कौटाळून ॥ माथ्याचे किडे काढून ॥ म्हणे बा तुज कोणें हाणिलें ॥ ३० ॥ अदृश्य रूपें देव पहाती ॥ धर्म कृपाळू म्हणती ॥ मग ते सत्वर आणविती ॥ विमान देवा इंद्राचें ॥ ३१ ॥ पुढें पाहतां मार्ग नाहीं मेरुसी ॥ मग बोलावूनि देवदूतांसी ॥ आणविते झाले विमानासी ॥ स्वर्ग भुवनापासूनियां ॥ ३२ ॥ तेथें पताका निशाणें झळकती ॥ महा दुंदुभी भेरी वाजती ॥ अप्सरा गण नाना रीती ॥ करिती नृत्य गायनें ॥ ३३ ॥ तये विमानामाजी जाण ॥ गण गंधर्व करिती गायन ॥ ताल मृदंग वीणा वादन ॥ नाद गगनीं न समाये ॥ ३४ ॥ विमान गिरीवरूनी उतरलें ॥ दूतीं धर्मासि नमस्कारिलें ॥ जी या विमानामाजी बैसलें ॥ पाहिजे स्वामियां ॥ ३५ ॥ तंव धर्म म्हणे तया दूतांसी ॥ आधीं बैसवावें या श्वानासी ॥ कोणी नाहीं गा यासी ॥ मजवांचुनी ॥ ३६ ॥ अगा म्यां स्वर्गी करितां गमन ॥ मागें यातें सांभाळील कोण ॥ दूत म्हणती आम्हा लागुन ॥ आज्ञा नाहीं न्यावयाची ॥ ३७ ॥ जी तुम्ही धर्मपरायण नृपती ॥ म्हणोनि विमानाची तुम्हासि प्राप्ती ॥ श्वानें केविं स्वर्गासि येती ॥ विमानीं बैसोनियां ॥ ३८ ॥ मग धर्म म्हणे हा दुःखित प्राणी ॥ यास जरी

न द्याल विमानीं ॥ तरी तुम्हीं जावें परतोनी ॥ या वेगळा मी न यें ॥ ३९ ॥ ऐसा धर्म जंव बोलिला ॥ तंव तो श्वानाचा इंद्र झाला ॥ धर्मा त्यानें नमस्कारिला ॥ तैसाचि सकळ सुरवरीं ॥ ४० ॥ तेथें दुंदुभी भेरी लागलें निशाण ॥ धर्मासी अंगुष्ठ झाला पूर्ण ॥ मग तो विमानीं बैसोन ॥ स्वर्गभुवना चालिला ॥ ४१ ॥ एकवीस माळी यांचे लोक पहाती ॥ म्हणती धन्य धन्य या धर्माची कीर्ती ॥ जय जयकार महान् करिती ॥ सर्व सुरवर स्वर्गींचे ॥ ४२ ॥ विमान जातसे वैकुंठासी ॥ तंव दूत म्हणती एकमेकांसी ॥ हिंसा घडली धर्मासी ॥ कैसें जावें शुद्ध मार्गें ॥ ४३ ॥ मग एकमेकांसी पुसती दूत ॥ जी धर्मासी हें कैसें प्राप्त ॥ तंव ते सांगती वृत्तांत ॥ एकमेकांसी ॥ ४४ ॥ सभे बैसला होता युधिष्ठिर ॥ धीवरें येऊनि केला जोहार ॥ जी या पीडिलों क्षुधेनें थोर ॥ मज स्त्रियेनें फार गांजिलें ॥ ४५ ॥ ऐकोनि धीवराचें वचन ॥ गहिंवरलें धर्माचें मन ॥ विकळवाणें तयाचें वदन ॥ नयनीं जेव्हां देखिलें ॥ ४६ ॥ तें करुणा उपजली धर्मासी ॥ म्हणे अन्न काय होईल यासी ॥ मग सोनटका तयासी ॥ दीधला धर्में ॥ ४७ ॥ धीवर थोर आनंदला ॥

रो. ७॥

6

हर्षयुक्त घरासी आला ॥ वृत्तांत सर्व सांगितला ॥ स्त्रिये आणि बाळकांसी ॥ ४८ ॥ मग धीवरें काय केलें ॥ त्या सोनटक्यासी मोडिलें ॥ मग सूत विकत घेतलें ॥ धीवरें त्या द्रव्याचें ॥ ४९ ॥ मग त्या सुताचें पाहें ॥ मोठें जाळें केलें आहे ॥ प्रत्यहीं तो पारधीस जाय ॥ खेळे पारधी जळांत ॥ ५० ॥ जळीं जाळें असे टाकित ॥ आपुलें उदर पोशी सतत ॥ मीन मारी असंख्यात ॥ म्हणे हा प्रसाद धर्माचा ॥ ५१ ॥ ऐसा प्रत्यहीं उपकार ॥ धर्माचा मानी तो धीवर ॥ अगा हा ऐसा अविचार ॥ धर्मासि प्राप्त येणें गुणें ॥ ५२ ॥ अगा सर्वांसी द्यावें अन्न ॥ परी दान द्यावें पात्र पाहून ॥ म्हणोनि धर्मासी पतन ॥ हिंसासंगें दोष घडला ॥ ५३ ॥ हिंसासंगें नरक प्राप्ती ॥ ऐसी धर्मशास्त्राची नीती ॥ म्हणोनि येणें घडलें यमावती ॥ पुरावरूनियां ॥ ५४ ॥ ऐसी ही देवाची माव ॥ काय झाला धर्माचा अन्याय ॥ कीं उद्धरावया सर्व जीव ॥ कुंभीपाकींचे ॥ ५५ ॥ म्हणोनि त्याचें विमान पाहें ॥ यमपुराहूनी जात आहे ॥ द्वादश योजनें पर्यंत लवलाहें ॥ महा दुर्गंधी येतसे ॥ ५६ ॥ तंव धर्म म्हणे दूतांप्रती ॥ या मार्गें कां आलेती ॥ कीं तो स्वर्ग मार्ग चुकलेती ॥ म्हणोनि आले तया मार्गें ॥ ५७ ॥ तंव

तें कळलें धर्मासी ॥ कीं द्रव्य दिधलें धीवरासी ॥ तो दोष आला आम्हासी ॥ मीन हत्येचा ॥ ५८ ॥ तया पापास्तव पाहें ॥ विमान यमपुरीहूनि जात आहे ॥ दुर्गंधीनें धर्मराय ॥ श्रमला मनीं अत्यंत ॥ ५९ ॥ मग धर्में काय केलें ॥ दूतांसी सत्वर बोलाविलें ॥ अगा तुम्हीं जावें वहिलें ॥ यमपुरीसीं ॥ ६० ॥ जीवांसी सांगावी मात ॥ कीं जितके असाल कुंभी-पाकांत ॥ तितुके येऊनि समस्त ॥ मजसी दृष्टीं विलोकिजे ॥ ६१ ॥ ऐसें ऐकोनियां वचन ॥ दूत गेले पुढें धांवोन ॥ कुंभीपाकापुढें उभे राहोन ॥ सांगती मात जीवांसी ॥ ६२ ॥ आतां परिसा आमुची मात ॥ या मार्गीं धर्म असे येत ॥ तयासी हो तुम्हीं समस्त ॥ दृष्टीं पहा सत्वरीं ॥ ६३ ॥ धर्मरायाची आज्ञा ऐसी ॥ आम्हीं येतों या मार्गासी ॥ दृष्टी उदार सर्वांसी ॥ येतां मार्गीं होईल ॥ ६४ ॥ ऐकोनि दूतांचिया बोला ॥ सकळांसी आनंद झाला ॥ तंव दुर्योधनाला ॥ महा दुःख वाटलें ॥ ६५ ॥ म्हणे धर्माचिया दृष्टी पाहें ॥ आतां मी उद्धरूं काय ॥ म्हणोनि तो करीता हे ॥ थोर दुःख कुंभिपाकीं ॥ ६६ ॥ ये कुंभिपाकींचे जीव जंत ॥

संतोषले असती समस्त ॥ तंव दुंदुभी भेरी वाजत ॥ आला म्हणती धर्मराजा ॥ ६७ ॥ तंव तो कुंभीपाक जाण ॥ चौऱ्यांशीं गांवें विस्तीर्ण ॥ अनेक जीव उभे राहोन ॥ धर्म दृष्टी पाहती ॥ ६८ ॥ पापकर्मी उद्धरोनि जाय ॥ दुर्योधन म्हणे धर्म दृष्टीं उद्धरूं काय ॥ म्हणोनि बुडी देत आहे ॥ कुंभिपाकीं तो दुष्टबुद्धी. ॥ ६९ ॥ तंव धर्मासी भक्त विनवीत ॥ जी दुर्योधन आहे जात ॥ बुडी द्यावया कुंभिपाकांत ॥ तुम्हांसि येतां देखोनियां ॥ ७० ॥ मग धर्म विचारी मानसीं ॥ म्हणे कैसें जावें सोडोनि यासी ॥ मग तेथें उभा षण्मासी ॥ वाट पाहे तयाची ॥ ७१ ॥ उभा राहिला षण्मास ॥ आतां निर्बंध दुर्योधनास ॥ मग टाकावया श्वास ॥ बाहेर असे उसळला ॥ ७२ ॥ ऐसा बाप धर्मरावो ॥ दृष्टीं उद्धरिलें जीव पहा हो ॥ पुढें श्रीकृष्ण देवो ॥ धर्म भेटीसीं पैं आले ॥ ७३ ॥ सर्वे सुरगण समस्त ॥ ब्रह्मा स्तुती असे करीत ॥ तेथें क्षेम असे होत ॥ देव आणि धर्मासी ॥ ७४ ॥ क्षेम दोघांसी पैं झाली ॥ जीवन कळा एक केली ॥ ज्योतीसी ज्योति मिळाली ॥ त्यासि उपमा नाहींच ॥ ७५ ॥

तंव क्षेम सोडोनि धर्म उभा ठेला ॥ मग भीम अर्जुन पायांसी लागला ॥ नकुळ सहदेव तैसाचि भेटला ॥ द्रौपदी लागली चरणासी ॥ ७६ ॥ तंव देखिली कुंती माय ॥ धर्में धरिले तिचे पाय ॥ पुनीत तयाचा देह होय ॥ म्हणोनियां ॥ ७७ ॥ वैकुंठपतीचा आप्त म्हणोनी ॥ धर्मासि भेटली रुक्मिणी ॥ मग वैकुंठीं आल्हादपूर्ण होऊनी ॥ मखरें तोरणें उभविती ॥ ७८ ॥ शृंगारिली वैकुंठ नगरी ॥ आनंद झाला घरोघरीं ॥ तेथें धर्मराजा राज्य करी ॥ निरंतर जाण पां ॥ ७९ ॥ राया काय वानूं त्या सुखासी ॥ पूर्ण गोडी त्या अनुभवियांसी ॥ उच्छिष्ट पदार्थ विष्णु दासासी ॥ नामा पंक्तिसीं राहिला ॥ ८० ॥ अशी महा भारतीं कथा ॥ वैशंपायनें सांगितली परीक्षिती सुता ॥ म्हणोनि ब्रह्म हत्या गेल्या तत्वता ॥ जन्मेजयाचिया ॥ ८१ ॥ मग राव करी काय ॥ उपकारासी उत्तीर्ण होऊं काय ॥ तीर्थवंदनीं धरिले पाय ॥ ऋषी षोडशोपचारें पूजिला ॥ ८२ ॥ जी मज दोषा वेगळें केलें ॥ पातकापासोनि सोडविलें ॥ मग ऋषीनें बद्रीं बैसविलें ॥ पूजिला राय जन्मेजय ॥ ८३ ॥ तेथें भेरी दुंदुभी वाजती ॥

10

निशाणें तुरें गर्जती ॥ स्वर्गीं देव पुष्पवृष्टि करोनि म्हणती ॥ शोभा वंशीं दीधली येणें ॥ ८४ ॥ मग तो राजा जन्मेजय पाहे ॥ प्रत्यहीं भारत कथा सेविताहे ॥ पूर्वजांसी मोक्ष होय ॥ ही कथा ऐकीलेया ॥ ८५ ॥ जी ही कथा पुण्य पावन ॥ भावार्थें भाविती परमहंस जाण ॥ पातकासी मुळींहून ॥ उपटोनियां टाकिता ॥ ८६ ॥ जी हे कथा नित्य पाहे ॥ प्रभातेसी ऐकता हे ॥ नित्य दिनीं त्याचे देह ॥ होतील विष्णुरूप ॥ ८७ ॥ ऐसे देव धर्म एक होती ॥ परी बोलतां दोन दिसती ॥ तैसें श्रोता वक्ता दोन म्हणती ॥ परी असती एकरूप ॥ ८८ ॥ ऐसें चित्त चौघांचें एक होय ॥ ते केवळ एकरूप पाहें ॥ चित्त शुद्धयर्थ ऐकावी हे ॥ पुण्य कथा भारतींची ॥ ८९ ॥ पुण्य झालिया संचित ॥ पुढें केवळ कृपा होय तेथ ॥ श्रोतियांचें विशुद्ध चित्त ॥ काढोनि वेई स्वामी तो ॥ ९० ॥ ही कथा ऐकतां सुख आहे ॥ आणि अवघें कृष्ण रूप होय ॥ महा पापासि नाश होय ॥ निःसंशय हेंचि जाणा ॥ ९१ ॥ श्रोत्यांसि माझी विनवणी ॥ मीं शिणविलें कथा सांगोनी ॥ स्वामी माझ्या बोबडिया

वचनीं ॥ कृष्ण नाम घ्या सदा ॥ १२ ॥ जी ये भारत कथेसी ॥ लिहितां उद्धरी पूर्वजांसी ॥ आणि तेच हृषीकेशी ॥ होती हरिरूप ॥ १३ ॥ ऐसें बोलोनियां वचन ॥ ग्रंथ झाला संपूर्ण ॥ भारत संपलें येथून ॥ सांगे नामा विष्णुदास ॥ १४ ॥ वांझी पाळणे बांधिती ॥ निपुत्रिकांसी पुत्र होती ॥ जे भारती कथा ऐकती ॥ ते उद्धरिती कोटिकुळां ॥ १५ ॥ इति श्रीमन्महाभारते स्वर्गारोहणपर्व कथा सप्तमोध्यायः ॥ ७ ॥

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

11